# दुसऱ्या आवृत्तीची प्रस्तावना.

ईशकृपेनें प्रस्तुत नाटकाची दुसरी आवृत्ति काढण्याचा प्रसंग आला ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. प्रथम आवृत्ति सन १८९५ साली निघाली व त्या वेळेपासून आज पावेतों या नाटकाचे प्रयोग महाराष्ट्र देशांतिल बहुतेक मोठमोठ्या शहरीं प्रसिद्ध शाहुनगर-वासी नाटकमंडळीकडून झाले, व ते लोकांस अत्यंत पसंतही पडले. याच कारणामुळें आम्हांस ही दुसरी आवृत्ति काढण्यास उत्ते-जन आलें.

ग्रंथ शेवटास जाणें हें ईश्वरकृपेचें फळ आहे. ग्रंथकर्तृत्वाचा मीपणा मिरविणें व्यर्थ होय. खालीं लिहिलेल्या ओंवीकडे पाहिलें म्हणजे आमच्या मीपणाचा आमच्यांत लोप होऊन जातो.

ज्यां बोलविल्या वेद बोले। ज्यां चालविल्या सूर्य चाले॥
ज्यां हालविल्या प्राण हाले। जो जगातें चालिता॥ १॥

( श्री ज्ञानदेव )

मुक्काम पुणें, पेठ कसबा घ० नं० २१०, तारीख २० जून सन १९०७ इसवी.

वासुदेव रंगनाथ शिरवळकर,
ग्रंथकर्ता.

हें पुस्तक

# प्रोफेसर काशिनाथ विनायक छत्रे

जगत्प्रसिद्ध

दि न्यू इंडियन् सरकस्‌चे मालक

थांस

त्यांनीं स्वधर्मश्रद्धेच्या व ईश्वरनिष्ठेच्या बळावर,
आपल्या अश्रांत परिश्रमानें व दृढ निश्चयानें,
हातीं घेतलेल्या महत्कृत्यांत पूर्ण यश संपा-
दून या आर्यावर्त्तांतच नव्हे तर पौरस्त्य
व पाश्चात्य राष्ट्रांतही लोकोत्तर का-
र्यकर्तृत्वाचा जो थोर लौकिक
संपादन केला आहे

त्याबद्दल

पुस्तककर्त्यांस वाटणाऱ्या अभिमानाचें अल्पसें
द्योतक ह्मणून
त्यांच्या परवानगीनें
प्रेमपूर्वक

अर्पण केलें आहे.

पुस्तककर्ता.

# नाटकांतील पात्रें.

विश्वासराव..............नानासाहेब पेशवे यांचा मुलगा.
माधवराव.............नानासाहेब पेशवे यांचा धाकटा मुलगा
भाऊसाहेब ..............चिमणाजी आप्पा यांचे चिरंजीव.
जनकोजी शिंदे...........पेशव्यांचे सरदार.
मल्हारराव होळकर.........      ,,
बळवंतराव मेहेंदळे ...... भाऊसाहेब यांचे खाजगी कारभारी व मसलतदार.
समशेरबहादर ............पहिले बाजीरावाचा पुत्र.
इब्राहिमखान गारदी...पेशव्यांच्या रिसाल्यांचा एक अधिकारी.
राजाराम चोपदार......शिंद्याच्या रिसाल्याचा एक अधिकारी.
सुरजमल जाट............ कुंभेरी किल्ल्याचा जमीनदार.
आप्पाराव ............... बळवंतराव मेहेंदळे यांचा मुलगा.
काशीराज..................बादशहाचे तर्फे वकील.
अहमदशहा अबदल्ली ...... कंदाहारचा बादशहा.
वजीर शहावलीखान...... मुख्य वजीर.
सुजाउद्दवला..............अयोध्येचा नबाब.
नजीबखान रोहिला ...... गाजिउद्दिन याचा प्यादा.
कुतुबशहा..................नजीबखानाचा वस्ताद.
सयमतखान कतलबाज } नजीबखानचे दोस्त.
अहमदखान लंगडा पठाण } नजीबखानचे दोस्त.
बरखोरदारखान............बादशहाचा सरदार.
उमरावगीर गोसावी ...... सुजाउद्दवल्याचा सरदार.
गोपिकाबाई ............... नानासाहेब पेशव्यांची बायको.
लक्ष्मीबाई.................. बळवंतराव मेहेंदळे यांचें कुटुंब.
मर्जीना.....................गाजिउद्दीनची बहीण.

बादशहाचा खुषमस्कऱ्या, मकांडा शिद्दी, भालदार, चोपदार चाकरमाणसें वगैरे.

# असमानी सुलतानी

अथवा

# पानपतचा मुकाबला.

## अंक पहिला.

### प्रवेश १ ला.

**स्थळ—यमुनानदीचा किनारा.**

( उमरावगीर गोसावी व राजाराम चोपदार प्रवेश करितात )

**उमराव॰**—त्या निमकहरामी नजीबखानाचें नुसतें नांवसुद्धां या कानानें ऐकवत नाहीं. आपला मालक गाजीउद्दीनखान वजीर याच्याशीं दगलबाजी करून, ज्यानें कंदहाराचा पादशहा अहमदशहा अबदल्ली खास गुदस्ता बोलावून आणून दिल्ली शहराची बेचिराख केली. गिलच्यांनीं पुरुष, स्त्रिया, मुलेंबाळें, गाढवें, कुत्रीं, गाई, म्हशी जें हातीं सांपडलें त्यांची कत्तल केली. साडेतीन घटकेंत [illegible] हजार माणसांची कत्तल या नजीबखान रोहिल्याच्या पायीं [illegible]. कुरुक्षेत्रीं तीर्थें बाटवून बिचाऱ्या ब्राह्मणांचीं घरें जमीनदोस्त [illegible]. पलवल मुक्कामीं अंताजी माणकेश्वराच्या पं[illegible] फौजेची [illegible]खान कतलबाज यानें मुंडकीं छाटलीं. [illegible] [illegible] बैराग्यांची कत्तल केली. मथुरेंत [illegible] काढला, तेव्हां कित्येक पति[illegible]

बचावाकरितां यमुनेच्या डोहांत उड्या घातल्या. त्यांनां संकटीं ईश्वर सहाय्य झाला. यमुनेचें पाणी कंबरेबरोबर होऊन त्या बायकांनां वाट मिळून त्या नदीपार झाल्या. त्यांच्या मागून गिलचे घोडे घालूं लागले ते बुडूं लागले. इतके अनर्थ या नजीबखानाचे पायीं झाले.

**राजाराम**—पण देवानें त्या वेळीं त्याला योग्य शासन केलें होतें. अहमदशहा त्याची किंमत जाणूनच होता. उघडच आहे कीं, नजीबखान ज्याच्या इथें वाढला त्याच्याच जिवावर उठला. अबदल्लीनें नजीबखान यास कळविलें कीं, "सालमजकुरीं आम्हीं कंदहारास जातों. पेस्तर सालीं येऊन सगळा बंदोबस्त करूं. तोंपावेतों तुम्हीं दिल्लीचा किल्ला राखावा." पांचहजार फौज त्याच्या मदतीस ठेविली. दिल्लीच्या पादशहास जीवदान देऊन सेमतखान कतलबाज यास दहा हजार फौजेनिशीं कुरुक्षेत्री ठेविला, व आपण कंदहारास निघुन गेला.

**उमराव**०—मग यांत त्यास विशेषसें शासन तें काय झालें ?

**राजाराम**—कुरुक्षेत्र, मथुरा, वृंदावन, पल्वल, इत्यादि ठिकाणीं हिंदुलोकांची कत्तल उडाल्याची बातमी रघुनाथराव दादा व सुभेदार मल्हारराव होळकर यांनां कळतांच ते प्रथम जे दबत दबत चालले होते, ते मोठमोठाल्या मजला करूं लागले. इकडे अंताजी माणकेश्वर यांनीं दत्ताजी शिंद्यास पत्रावर पत्रें पाठविलीं कीं, "हिंदुस्थान हातचें गेलें, जलदी करून फौजबंदी करून दिल्लीवर यावें." दत्ताजीनें नालबंदीचे दिवस नसतां वैशाखमासीं चाळीस हजार फौजेस नालबंदी दिली. इतक्यांत दिल्लीच्या वकीलाचीं पत्रें आलीं कीं, दुराणी फौजेसुद्धां निघून आपले मुलखांत गेला, व राजश्री दादासाहेब यांची फौज चंमेलीपार झाली. या दादासा-
हे [illegible] गरींत दादासाहेबांनीं लाहोर काबीज करून रु-
सिंधुनदाचें पाणी पाजलें, आणि शिवाजी
[illegible]वर फडकावयास लावला. तूर्त यावयाचें
[illegible] चतुर्मास दम खाऊन राहिले.

दादासाहेब यांनीं अग्यानजीक येऊन सुरजमल जाट याजपाशीं खंडणी घेऊन अग्यात गाजीउद्दीन होता त्याला आपल्या ताब्यांत घेतला. तेथून कूच करून स्वारी दिल्लीस आली. शहराचा सत्यनाश करून किल्ल्यास मोरचे लावले. पंधरा दिवस किल्ल्यांतून नजिबखान झुंजला. पण, त्याची खातरी झाली कीं, मराठे मला आतां जिवंत सोडीत नाहींत. या वेळीं त्यास अबदल्लीची कुमक नव्हती. तेव्हां सुभेदार मल्हारराव होळकर यांजकडे त्यानें अंतस्थ निरोप पाठविला कीं, "मी तुझा धर्मपुत्र आहें—मी शरण आहें, शरण आल्यास मरण चिंतूं नये." सुभेदारांनीं दादासाहेबांस पदर पसरून मागणें मागितलें कीं, नजीबखानाचा जीव घेऊं नये. या त्यांच्या विनंतीस दादासाहेबांनीं मान दिला. कांहीं दिवसांनीं त्यांनीं त्याला दत्ताजी व जनकोजी यांच्या स्वाधीन केला. त्यांनीं त्यास नजर कैदेंत ठेविलें होतें. तेव्हांच त्यांनीं त्याचें डोकें उडविलें असतें म्हणजे आज दत्ताजींचें डोकें बचावलें गेलें असतें.

**उमराव०**—अरेरे!! तर मग या नजीबखानाचा केव्हांच निकाल लागला असता आं! आतां माझे ध्यानांत आलें कीं, मल्हारराव होळकर यांनीं त्यास प्रथम पुत्राप्रमाणें मानिलें, आणि याच दत्ताजीनें जनकोजी सांगत असतां न मानतां बेमान नजीबखानास तुझें मी रक्षण करीन ह्मणून बेलभंडार उचलून दिला. त्यानेंही मी तुझ्याशीं बेइमान होणार नाहीं म्हणून साजकगेटी यास दिली. गोविंदपंत बुंदेल्यानां वाटलें कीं, नजीबखान ह्मणजे मोठा इमानी, जिवास जीव देणारा दोस्त. कोणाच्याच ध्यानांत असें आलें नाहीं कीं, ज्यानें आपला मालक गाजीउद्दीन याच्याशीं हरामखोरी करून त्यास कैद केलें, इतकेंच नाहीं पण त्याच्या घरच्या कांहीं बायकासुद्धां आपल्या घरांत घातल्या तो आमच्याशीं किती नेक-जादीनें वागणार आहे. पण कायहो, पुढें नजीबखान सुजाउद्दवला याजकडे गेला तरी कसा!

**राजाराम**—मल्हारराव होळकर यांनीं दत्ताजी शिंदे यांच्या जवळ नजीबखानास जिवंत ठेवण्याविषयीं विनंति केली. दत्ताजीनें

नजीबापासून असा करार करून घेतला कीं, त्यानें भागीरथीस पूल बांधून द्यावा. हा करार नजीबानें कबूल केला. उभयतांनीं एकमेकांच्या आणा शपथा घेतल्या. पुढें नजीबखानानें बोलणें लाविलें कीं, दत्ताजीनें गडमुक्तेश्वरी जाऊन तीर्थविधि करावा, दरम्यान एक महिन्याचे मुदतींत शुकतालानजीक मी भागीरथीस पूल बांधतों. अशी गुलजार थाप देऊन दत्ताजीपासून नजीबखान पसार होऊन सुजाउद्दवला याजकडे जाऊन मिळाला. आयोध्येस जातांच संदेशा पाठविला कीं, तुमच्याच्यानें होईल तें करून घ्या, आम्ही फिरून तुमची मुलाखत घेत नाही.

**उमराव**—पाहिला कसा आहे तो उलट्या काळजाचा मात्रागमनी !

**राजाराम**—नंतर दत्ताजीनें बोलणें लाविलें कीं, सुजाउद्दवला व तुम्ही मिळून एक कोट रुपये खंडणी द्यावी, नाहींतर लढाईस तयार व्हावें. कूच करण्याचा नगारा करून शुकतालावर जाऊन पोंहचले. दत्ताजी आणि जनकोजी उभयतां चुलते पुतणे सारखेच हिम्मतबहाद्दर. घोड्यास तंगबार करून खासा जनकोजी शिंदे हर हर महादेव करून उठला. इकडून दत्ताजीनें दांतकिरकिटीस येऊन गर्दीत घोडें घातलें. उभयतां तोफांच्या माऱ्यांत सांपडले. जेजाला, बंदुकी, कडाबिनी. हस्तनाला, सुतारनाला यांचा मोठा कडाका उडाला. मांडीसमांडी भिडून तलवारींची टिप्परघाई झाली. तोफेचा गोळा लागून दत्ताजीखालचा घोडा, खंदकाच्या तोंडावर ठार पडला; तेव्हां पाटील पाय-उतारा झाला. हातांत तलवार घेऊन खंदकाचे तोंडापाशीं उभे राहिले. मोठा हिमतीचा पुरुष ! त्याजवर घाव करण्याची कोणाची छाती होईना. तलवार फेंकून मारली त्यासरसा एका रोहिल्याचा प्राण घेतला. खासा जनकोजी शिंदा खंदकाला पाठ देऊन उभा राहिला होता. जनकोजीची उमर केवळ वीस वर्षांची, पण हिम्मत भारी. जनकोजीला मणगटाजवळ तलवारीचा वार लागला. दत्ताजीस एक भाल्याची जखम झाली आणि मानेस कतरती गोळी लागली. नंतर उभयतां खाशांस मोठ्या जबरीनें ओढून परत नेलें.

**उमराव०**—पण आजचा प्रसंग फार भयंकर! आजचा प्रसंग सहसा आला नसता, परंतु सुजाउद्दवल्याची मोंगलाई मसलत मला उमगली नाहीं. करोड रुपयांच्या खंडणीबद्दल मजला—मी सुजाउद्दवल्याचा माताहत असल्यानें—मध्यस्थि करावयास पाठविलें होतें. एक हज्जार फौजेनिशीं दत्ताजीनें व जनकोजीनें सुजाउद्दवल्याचे भेटीस जावें, ह्मणून बोलणें करण्यास मी दत्ताजीच्या छावणींत आलों होतों; आमच्या सवालास जनकोजीनें जाबसाल केला कीं, नवाबानेंच हजार रोहिल्यांनिशीं आमच्या मुलाखतीला यावें. सुजाउद्दवल्याची ही मसलत जर तडीस जाती, तर त्याला शिंद्यांची शिकार सहजच मिळाली असती. मला हा त्याचा कावा जर अगोदर कळता तर मी शिंद्यांना तेव्हांच इशारा केला असता.

**राजाराम**—तुमचे हे कावेदावे चालले असतांना इकडे नजीबखान आपला भाऊ कंदहारास पाठवून चाळीस हजार गिलच्यांनिशीं अहमदशहा अबदल्लीला फिरून घेऊन आला. ही बातमी शिंद्यांस कळतांच त्यानें गोविंदपंत बुंदेले व अंताजी माणकेश्वर यांचे बरोबर पंधरा हजार फौज देऊन, त्यांना गिलच्यांच्या तोंडावर रवाना केलें. ते प्रथम मोठ्या आवेशानें गिलच्यांवर चालून गेले पण मग त्यांच्या पोटांत हरणांचीं काळजें शिरलीं. निशाणें माघारीं फिरवून तडक माघारे पळूं लागले. तेव्हां गिलच्यांनीं त्यांचा पाठलाग केला आणि कुणबी जसा विळ्यांनीं धसा धसा कणसें कापतो तशीं गिलच्यांनीं आमच्या फौजेचीं डोकीं कापलीं.

**उमराव०**—एवढा घात झाला पण दत्ताजी मोठा छातीचा पुरुष! आज सकाळीं फिरून त्यानें लढाईला तोंड दिलें.

**राजाराम**—आज उभे राहिले! आजचा संक्रांतीचा सण, सकाळीं तीन घटका दिवसास लढाईला आरंभ झाला अबदल्लीस सुजाउद्दवला पन्नास हजार फौज व तीनशें तोफा घेऊन मिळाला. नजीबखान वीस हजार रोहिल्यांनिशीं मिळाला. अनुपशहराहून लंगडा अहमदखान पठाण दहा हजार फौजेनिशीं मिळाला. अशी लाख सव्वालाख फौज एके ठिकाणीं मिळाली. काल संध्याकाळीं नारोशंकर,

जानराव वावळे, गोविंदपंत बुंदेले, खासा जनकोजी शिंदे व दत्ताजींचें कुटुंब यांनीं विनंति केली कीं, आपणाजवळ सारी पन्नास हजार फौज, दुराणी फौजेनें मोठा बळ धरून आहे करितां या वेळीं लडाईचा नाद सोडून द्यावा हें बरें.

( **दत्ताजीचें** डोकें घेऊन कांहीं मंडळी येतात. **राजाराम** डोकें हातात घेतो. )

**उमराव०**—मग यावर दत्ताजीनें काय उत्तर केलें ? पण हें पहा दत्ताजीचें डोकें आणलें माझे चाकरांनीं. आहारे पाटील, गेलास आह्माला सोडून ! ! !

**राजाराम**—उमराव, दत्ताजी ह्मणजे प्रतिकृतांत, रणमैदान नुसता दणाणून सोडणारा, पहिल्या धडाक्यासरशी सिंहासारखी शत्रूंच्या कमरग्यांत झांप टाकून शत्रूंची फळी फोडून टाकणारा, ज्यानें रघुनाथराव दादासाहेब यांचेबरोबर सौदवाडा, खेचीवाडा, बुंदी, कोटा, राजगड, पाटण, उदेपूर, जयनगर, नरवार, झांशी, काल्पी, इत्यादि ठिकाणीं खंडण्या घेण्यास जयाप्पा शिंद्यांस बरोबरीनें मदत केली, कुंभेरीच्या वेढ्यांत तरी दत्ताजीच्या अनुमोदनानेंच जयाप्पा शिंदे सुरजमल जाटाचा पगडीभाई झाला, व ज्या मल्हारराव होळकरानें प्रतिज्ञा केली कीं, सुरजमल जाटाचा शिरच्छेद करीन, इतकेंच नाहीं तर, कुंभेरीची माती यमुनेंत टाकीन, नाहीं तर प्राणत्याग करीन, ती मल्हारराव होळकराची प्रतिज्ञा दत्ताजीची मदत न मिळाल्यानें फिक्की पडली. नागुरास बिजयसिंग यानें मोंगलाई मसलत करून जयाप्पाचा मारेकऱ्यांच्या हातून जेव्हां बरगडींत निमचा खुपसून खून केला, तेव्हां दत्ताजीनें तीनशें रजपूत कापून काढून विजयसिंगाला मार्गे सारून गांवांत घातला. एकंदर वेढा अठरा महिने पडला, पण दत्ताजी हटला नाहीं. भावाचा सूड पुरा घेतला. शेवटीं बिजयसिंगानें अजीज होऊन वकील पाठवून दत्ताजीची खातरजमा करून एक कोट रुपये रोख आणि अजमीर, मेढते, बिकानीर इत्यादि ठाणीं देऊन सल्ला करविला, सिंदखेड येथें निजाम अल्लीनें भोंवताला तोफांचा आराबा देऊन गोल बांधून दत्ताजीशीं सामना बांधला,

त्या दिवशीं तर दत्ताजीनें करोळ, तोफा, जेजाला व झुतारनाला यांच्या दारुगोळा भरण्याच्या ढांसण्या स्वतः हातांत धरून मार केला. दुतर्फा तोफांचा असा कडकडाट उडाला कीं, जशा भडभुंजे लाह्या भाजतात. दत्ताजी त्या दिवशीं मदोन्मत्त हत्तीप्रमाणें खळीस आला होता. भाऊसाहेब नुसते त्यावेळीं मजा पहात होते. दत्ताजीचा पराक्रम पाहून त्यांचे नेत्र संतोषित झाले. त्यांनीं तारीफ केली कीं, "दत्ताजी शिंदे यांच्या मर्दुमकीची शर्थ आहे. जसा आजपावेतों लौकिक ऐकत आलों, तसाच आज प्रत्यक्ष पाहिला." निजामाची खात्री झाली कीं याप्रमाणें निधडा सरदार मराठ्यांत नाहीं.

सकाळीं या वीरानें, या रणनवऱ्यानें साफ उत्तर केलें कीं, मुलामाणसांची शाका करून हत्तीस अंदु घालून मारतां मारतां मरेन. मरणापेक्षां अपेश खोटें आहे. अपजय घेऊन नानासाहेब, भाऊसाहेब यांना तोंड काय दाखवूं ? हा कंदहारचा बादशहा आपण होऊन चालून आला आहे. या रानांत ईश्वरानें लढाईंत मृत्यु आणला तर फार उत्तम आहे. योगी, तपस्वी, संन्यासी, नानाप्रकारचे देहदंड करितात कीं, मोक्ष मिळावा. आम्हा क्षत्रियांचा धर्म हाच कीं, रणांत विन्मुख न होतां मृत्यु आल्यास सगळ्या इच्छा पूर्ण झाल्या. ईश्वरानें तो प्रसंग घडवून आणिला आहे. जो अभागी असेल तो तोंड चुकवील. मी रणमैदान सोडून निघणार नाहीं.

**उमराव**०—विलक्षण दृढनिश्चय !

**राजाराम**—त्यानें कांहीं आपला हेका सोडिला नाहीं. कुटुंबाची भेट घेऊन त्यांना रूपराम कटारी याजबराबर पांच हजार फौज देऊन चमेली पार रवाना करून दिलें. कुटुंबाला नऊ महिने भरलेले, त्यांच्या शोकास पारावार नाहींसा झाला. त्यांची खातरी तेव्हांच झाली कीं, मजला आजच पाटील अंतरले. सकाळीं तीन घटका दिवसास बातमी पोंचली कीं गिलच्या यमुना उतरून अलीकडे आला. शिंद्याची फौज जमून मुजऱ्यास आली. त्यासरसें "निशाणाबरोबर चलावें" म्हणून हुकूम झाला. यमुनेकांठीं अडचण भारी. जिकडे तिकडे शेरण्यांचीं बेटें. मोठ्या अडचणींत मराठे शिरले. निशाण

तर जाऊन युद्धास भिडले. लढाईचें तोंड लागलें. दोन्ही तर्फेनें तोफा, हस्तनाले, जंबूरे, बंदुकांचा असा धडाका झाला कीं, शेंकडों विजा आकाशांतून कडकडून खालीं पडत आहेत. बाणांचा पाऊस पडला. घोडीं, मनुष्यें धुंद झालीं. धुराची गर्दी झाली. वीरांना वीरश्री चढली. शिंद्याची फौज अडचणीनें फार गैच झाली. पांचशें माणूस पहिल्या सपाट्यासरसा ठार झाला.

**उमराव**—या वेळेस जनकोजी कोठें होते ?

**राजाराम**—जनकोजी निशाणाजवळ चळ बांधून होते. इतक्यांत त्यांच्या दंडास गोळी लागून दंड फोडून हाड बाहेर आलें. खासा जनकोजी घेरीं येऊन घोड्याखालीं आला. जवळ खिजमतगार उभा होता. त्यानें धूम मारून दत्ताजीला खबर दिली कीं, बाबासाहेब गोळी लागून पडले. दत्ताजी बोलले " बाबा मजला सोडून गेले. आतां देशीं तोंड दाखविण्यास येणार नाहीं. " असें बोलून लाल-मणी घोड्याला टांच मारली, आणि अठरा असाम्यांनिशीं कुतुबशहा व दुराणीचे लोक उभे होते त्यांवर घोडे घातले. घोड्यांचीं तोंडें शिरलीं नाहींत तोंच अकरा खासे ठार पडले. बाकीच्यांनीं घाव केला, तों यशवंतराव जगदळे यांस गोळी लागून ठार पडले. पाटील मुर्दा काढण्याकरितां बोलतात, तों बरगडींत गोळी घुसली, आणि घोड्याखालीं आले.

**उमराव**०—तुम्ही त्या वेळीं जवळ होतां काय ?

**राजाराम**०—मी मोठा कमनशिबाचा, कीं माझ्या देखत पाट-लांचा असा अंत व्हावा. मी आणखी राघोबा पागे आह्मीं दोघांनीं घोड्याखालीं उड्या घातल्या. आम्हीं विचार केला कीं, आमचे पिंड यांच्या अन्नाचे आहेत. पाहिजे तितके विलास यांच्या जिवावर केले. आतां यांनां सोडून जाणें नीचपणाचें काम होय. मला राघो-बानें हुकूम केला कीं, तुम्हीं कुतुबशहापाशीं धांवत जाऊन " पाटील घायाळ झाले आहेत म्हणून सांगा. नाहींतर अहमदशहा अबदल्ली बडा हरामी आहे. तो पाटलाचें शिर कापून नेईल. " ही बातमी मीं त्याला देतांच तो मोठ्या आनंदानें माझ्यामागें दौडत आला.

"पटेल कहां हय पटेल कहां हय" असें विचारूं लागला. त्या वेळीं दत्ताजी उताणे पडले होते. कुतुबशहानें सवाल केला कीं, "क्यंव पटेल हमारे सात और कभी लडेंगे?" दत्ताजीला कपट कळून आलें. त्यांनीं दम बांधून उत्तर केलें कीं, "इनसे अल्लाहुताला बचेंगे तो और बी लडेंगे."

**उमराव०**—हा जाबसाल त्याच्या मोठ्या जिव्हारीं झोंबला असेल!

**राजाराम**—त्यानें लागलीच कमरेचा सुरा काढला, आणि दत्ताजीला जोड्याची लाथ मारून पालथा घालून त्याचा चराचरा गळा कापिला. रात्रोचा पागे आणखी मीं दोघांनीं फार मारूजा केला कीं, एक कोट रुपये देतों, यांचा प्राण वांचवा; पण त्या नीचानें ऐकिलें नाहीं, भाल्याच्या टोंकाला शिर अडकवून फत्ते झाली ह्मणून सैदोन वाजवीत नजीबखानाकडे गेला. पुढचा प्रकार तुम्हांला माहीत आहेच. तुम्हीं दोन लाखांची निशा भरून शिर आपल्यापाशीं घेतलें, मोठी पुण्याई केली. आतां आपण चंदनकाष्ठें, तुलसीकाष्ठें, बेलकाष्ठें, आणून, यथाविधि यमुनेचे कांठीं दहन करूं. एवढा तालेवार पण त्याची दैवयोगानें अशी गत झाली. ( उभयतां जातात. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ-कोट पुतळी.

( डेऱ्यामध्यें **जनकोजी शिंदे** आजारी पडलेला आहे. दोन चाकर उशागतीं उभे आहेत. )

**जनकोजी**—गिलच्या म्हणजे बिशाद काय? मारे बुडवून गर्दीस मिळवून सोडला असता, पण काकांनीं सबूर केली नाहीं. मल्हारराव होळकर येऊन मिळेपावेतों त्यांनां नुसत्या गनीमी काव्यानें हुलकावण्या दाखवावयाच्या. ते महा हरामी लोक—त्यांच्यापाशीं आग भारी—त्यांच्या घोड्यास दुमची नाहीं.—असे सराईत बसणार. त्यांचा दम ताजा—आमच्या तोफा पल्लेदार पण माऱ्याची

जागा नाहीं. एक रंजुक झडली नाहीं तोंच आमचे लोक कचरले. हा कसूर त्यांचा नाहीं. त्यांना पाठबळ नाहीं. आतां बोलून काय फायदा. आभाळ फाटलें. (दुःखानें श्वास सोडून) हाय हाय!! आतां माझे दृष्टीस काका कशाचे पडतात? आप्पासाहेब प्रत्यक्ष माझे जन्मदाते, त्यांचा विजयसिंगानें खून केल्याचें मजला इतकें दुःख झालें नाहीं. परंतु या काकासाहेबांचे मरणानें माझी छाती फुटून गेली. दुःखाचा कडेलोट झाला. काकासाहेबांनीं मजला वडिलांचें स्मरण होऊं दिलें नाहीं आतां आमचे घरांत वडील माणूस कोण राहिला? माझें छत्र नाहींसें झालें. मी आतां वडीलपणाचे नात्यानें कोणाला हांक मारावी? अखेरपा-वेतों मी सांगत होतों कीं, त्या नजीबखानावर विश्वास ठेवूं नका. तो नेकजादा नाहीं. पण त्यांनां केवळ भुरळ पडली. अचबचब!!! एक कोट रुपये नक्त त्या अधम कुतुबशहाला राजारामानें कबूल केलें पण त्यानें ऐकिलें नाहीं म्हणतां? आणखी काकाचा गळा कापला. जायचंदी होऊन जमिनीवर बेहोष पडलेल्या शूर दत्ताजी शिंद्याला कुतुबशहानें लाथ मारिली? काय करूं काळीज पेट घेतें हो, पण उपाय नाहीं. उमरावगीर गोसाव्याचे आमचे घराण्यावर अनंत उपकार झाले. मला त्याच वेळीं मरण कसें नाहीं आलें?

**चाकर**–( एकीकडे ) जे शूर ते शूर. एवढा घायाळ झाला पण पाहिलें अक्षर तोंडांतून काय काढिलें? गिलच्या म्हणे गर्दीस मिळवून देऊं." याला म्हणतात अस्सल पाणी. बापसे बेटा सवाई. (उघडपणें) सरकार, सुभेदार मल्हारराव होळकर इकडे यावयास निघाले आहेत. या वेळीं त्यांचा मनसुबा आपण घ्यावा.

**मल्हारराव**–( प्रवेश करून एकीकडे ) कुंभेरीच्या वेढ्यांत, खंडे-राव प्रत्यक्ष माझ्या पोटचा गोळा तोफेच्या गोळ्यांनें ठार पडला. अहि-ल्याबाईसारख्या महापतिव्रतेला वैधव्य प्राप्त झालें. जयाप्पासारखा जोडीदार गेला. एवढाले दुःखाचे डोंगर गिळून गेलों. पण या दत्ताजीचे मरणानें अगदीं कळस केला. आतां प्रपंचांत राहून कांहीं एक नफा नाहीं. देहत्याग करावा किंवा वैराग्य धारण करून कोठें तरी निघून जावें. हें सगळें खरें, पण आमच्या कारभारणीची हिम्मत

दांडगी, मला ह्मणते, सुभेदार, तुमचें म्हातारपण झालें—तुम्ही बुद्रुक मनुष्य—तुह्मी दीन दुनिया पहात आलेले; आणखी तुह्मी शोक करितां? शिंद्यांचीं मुलें पहा केवढाले पराक्रम करून मारतां मारतां मेलीं!! हा जनकोजी पहा, याचें उमर पहा, अजून ओंठ पिळला तर दूध येईल. पण यानें केवढाले पराक्रम केले!! ही दुःखकारक वार्ता ऐकून माझ्या सगळ्या फौजेची छबी उतरून गेली. पण, आतां बोलून काय उपयोग? आह्मी जातीचे धनगर, आमचें कर्म ह्मटलें ह्मणजे घोंगड्या विणण्याचें; तें आम्ही सोडून देऊन सतीचें वाण घेतलें आहे. आतां छातीचा कोट करून यापेक्षां आलेले आघात सहन केले पाहिजेत. ( उघडपणें ) बाबा, ही तुझी काय अवस्था झाली. मला एकदां तुला आपल्याजवळ घेऊन देरे. ( जनकोजी शिंदे व मल्हारराव होळकर एकमेकांस पितापुत्राचे नात्यानें भेटतात. उभयतांतून प्रथम कोणाच्यानेंच बोलण्यास आरंभ करवेना. )

**जनकोजी**—सुभेदार, केवढा गहजब हा! आम्हीं त्या भगवंताचे घरीं चोरी कां केली होती? काका मला टाकून गेले. त्याचें मला विशेष दुःख नाहीं; पण त्यांची त्या नीच यवनांनीं फार बेअदबी केली. अभिमन्यु रणांत घायाळ होऊन पडल्यावर त्याला जसा जयद्रथानें लत्ताप्रहार केला, तशांतली गत काकांची झाली. शिंद्याचे घराण्याचा हा केवढा अपमान? कोण अप्रतिष्ठा? पण हा अपमान व ही बेअदबी आमची नाहीं. मी समजतों ही आमचे धनी, आमचे अन्नदाते, सरकार नानासाहेब, भाऊसाहेब, रघुनाथराव दादासाहेब यांची. आम्ही धन्याचे चाकर निमकहराम नाहीं. सरकारला नकूर चाकराचा अभिमान असेल तर घेतील सूड. अंगाची लाही लाही होते. धन्याला इभ्रत चढणारी आहे. सगळी हकीकत धन्याच्या पायापाशीं राजारामाबरोबर थैली पाठवून जाहीर केली आहे. सुभेदार, मी अगदीं वेडा झालों. मला दुःखानें कांहीं सुचत नाहीं. तुम्ही आमच्या घरांत वडील माणूस आहांत. मी आतां काकासाहेबांचे ठिकाणीं आपल्यास समजतों. आतां मीं काय करावें? मला त्याच वेळीं मरण कसें नाहीं आलें? ( कपाळाला हात देऊन खालीं पहातो. )

**मल्हारराव**—बाबा, हा मृत्युलोक आहे. केव्हांतरी जाणें आहेच. वडील कीर्ति करून करून गेले. तुह्मां आह्मांला तरी किती दिवस जगावयाचें आहे ? " सुपांतील हसती आणि जात्यांतील रडती " हा दृष्टांत ध्यानांत आणा. आई आपली नाहीं, बाप आपला नाहीं, काका आपला नाहीं. कोणी कोणाचें नाहीं. ज्याचा तो. संसारसुख ही केवळ दोनप्रहरची सावली आहे; राज्याचें वैभव हें केवळ स्वप्न आहे. हें सगळें सत्य आहे, पण आपल्याला तसें मानतां कामा नये. आपल्यावर मोठमोठालीं जोखमीचीं आणि जबाबदारीचीं कामें परमेश्वरानें ठेविलीं आहेत. आपल्या हालचालीनें देशांत मोठमोठाल्या घडामोडी होणार. आपण तळहातावर शीर घेऊन आपल्या धन्यासाठीं रणांगणांत हत्तीला अंदु ठोकून मारतां मारतां मेलें पाहिजे. पाटलाचें कुटुंब मोठ्या हिमतीची बायको. दुःखाचा आलेला उभाडा विषासारखा गिळून आमच्या [illegible]रभारणीबरोबर निरोप पाठविला कीं, जनकोजीला म्हणावें, [illegible]याप्पा शिंदे यांच्या पोटीं चौघी लेकी झाल्या, तशीच तूं एक [illegible]णखी झाला असतास, तर जांवई आला असता. पाटील काय [illegible]रून गेले. दुनिया, दौलत, महाल, मुलूख, खजिना, हत्ती, घोडा, तुम्हापाशीं ठेवून गेले. बायकांच्या तोंडचा असा निरोप पुरुषांनीं [illegible] ठेवण्यासारखा आहे.

**जनकोजी**—बाईच्या अशा भाषणांनीं मला तर या कोट[illegible]पावेतों जिवंत आणलें. ती माझी आईच आहे. चुलतींत आणि आइत कांहींच तफावत नाहीं. पण या प्रसंगीं तिचे हाल काय झाले, हें तुह्मीं ऐकिलेत तर तुमच्या अंगावर शहारे येतील. दंडाला गोळी लागून मी बेहेष होऊन घोड्याखालीं पडतांच, येसाजी भोईटे आणि जानराव बावळे यांनीं कडनिकड करून मला घोड्यावर बसवून दोन बाजूस दोघांनीं धरून फौजेंतून तडक पळ काढला. मला पाणी द्यावयास त्यांना दम निघेना. गिलचे पाठीमागें डांकीं कापीत चालले. याप्रमाणें मला त्यांनी मध्यरात्रीं चोवीस कोस आणलें. तोंपावेतों काकाची गत काय झाली, याची मला खबर

नाहीं. मध्येंच मीं लोकांस जर विचारिलें, कीं काकासाहेब कोठें आहेत? तर सांगत दत्ताजी शिंदे पुढें गेले. चोवीस कोसांवर आमचे बुणगे व कबिले उतरले होते. मी येईपावेतों बाईंना दत्ताजी शिंद्यां-चीं अवस्था ठाऊक नाहीं. मी आल्याचें वर्तमान वाड्यांत कळतांच मराठमोळा दिसरून जाऊन बाई व आमचीं घरचीं माणसें धांवत आली. पाटलाची खबर काय आहे ह्मणून तेच मला उलटे विचारूं लागले. मी उत्तर काय करणार, दुःखाची एकच आरोळी झाली.

**मल्हारराव**—अरेरे !! बाईवर मोठें संकट आलें !! कठीण प्रसंग !!!

**जनकोजी**—सुभेदार. अजून दुःखाची परमावधि पुढेंच आहे. पोतनीस व जामदार यांनीं येऊन अर्ज केला कीं, खजीना, कापडन-रमिना, उंटावर चालत होतें, वरकड कापड छकड्यांवर चालत होतें. आतां छकड्यांच्या जागीं छकडे राहिले. आतां ओझ्यांची वाट काय? त्या वेळीं आमच्या कुटुंबानें जाबसाल केला कीं एवढाले जीव गेले. आतां दौलतीची आशा कोणास आहे? तुह्मी खजीना आणि नरमिना कापड असेल तें उंटावर घाला, आणि डेरे व साधें कापड यांनां आग लावून द्या. असा हुकूम होतांच कचेरीचे डेरे, इतर सामान, खासे महालांतील भरजरीचे डेरे, जामदारखाने, नगारखान्याचे डेरे व साधें कापड यांनां आग लावून दिली. मोठा प्रलय झाला. मला बाय-कांच्या पालखींत बसवून आणलें. बायकांनां बसावयास घोडीं नाहींत; मग दोन कंठाळीचीं तट्टें धरलीं वेठीला. काकांचें कुटुंब गरोदर—नऊ महिने पूर्ण भरलेले. घोड्यावर बसण्याचें संकट—पण उपाय काय? एवढा हिम्मतबहाद्दर भेला, पण बिचारीला रडावयास फावलें नाहीं, किंवा माझ्या जखमा बांधावयास वेळ नाहीं.

**मल्हारराव**—रामराम !!! माझ्याच्यानें ऐकवत नाहीं.

**जनकोजी**—एकदिल पांचशें माणूस आमच्याबरोबर नाहीं. जिकडे तिकडे रानोमाळ माणसें निघून गेलीं. कोणास कोणी पुसेना रूपराम कटारी यांनीं आमची पालखी उतरून असा मनसुबा केला कीं, ' आतां दुराणी कांही आह्मांस निभावून जाऊं देत नाहीं, करि-

तां उभयतां बायांनां व मला, कोणास नकळतां रामगड अथवा कुंभेरीस नेऊन ठेवावें. दोन्ही महाकुबल जागा आहेत. तेथें दुराणीची दौड आली तरी आह्मी हटेले रजपूत हार जाणार नाहीं यावर आमच्या कुटुंबानें भीडमर्यादा सोडून, जाब केला कीं, जाट आमचा भाऊ कांहीं व्यंकटराव निंबाळकर नाहीं. किंवा मावळा भापकर नाहीं. तुह्मीं हा मनसुबा काय चालविला आहे ? रजपूतांनींच जर आह्मांस बर्दीत टाकलें तर काय करणार? आह्मासाठीं जे आमचे बरोबर जीवाची आशा सोडून आले आहेत, त्यांनां सोडून आह्मीं आपले जीव जगवून तरी काय करावयाचें आहे ? सोक्षमोक्ष जो चारचौघांत होईल तो होवो.

**मल्हारराव**—खऱ्या खऱ्या शहाणपणाची बुद्धि अशीच असते. शाबास तुमच्या कारभारणीची. काशीबाई तरी आमच्या अगदीं अहिल्याबाईसारखीच धीराची बायको.

**जनकोजी**—दिवस उगवावयास रेवडी गांवाजवळ आलों. "गिलच्या आलारे आला," अशी पुनः हूल उडाली. बावन्नबारदारीचे धनी जीव घेऊन पळाले. मोठमोठाले सरदार घोडे सोडून पहाडांत शिरले. प्रत्यक्ष बायकामुलें टाकून लोक पळूं लागले. तिथे वरकड काय पहावयाचें आहे. आमच्या पालखीचे भोई घाबरे होऊन पालखी टाकण्याचे बेतांत आले. तेव्हां बाईनीं भोयांची प्रार्थना केली कीं, ' तुह्मी बत्तीस भोई आहांत, तुह्मांवर घाव पडेपावेतों तुह्मीं पालखी टाकूं नये. दर असामीस शेर शेर सोन्याचें कडें इनाम देईन. ' मला बाई ह्मणाली ' बाबा, आतां मला घोड्यावर बसून पळवत नाहीं. तुह्मी झाडून पुढें चला. आणि एखादा जिव्हाळ्याचा माणूस मजबरोबर द्या. गिलच्या दृष्टी पडेवावेतों त्यानें माझें रक्षण करावें. आणि निभावणी होईनाशी झाली कीं, त्यानें माझे दोन तुकडे करावेत.' सुभेदारसाहेब, बाईचें हें भाषण माझ्या काळजाला कसें झोंबलें असेल ? पण काय उपयोग ? आवजी आनंदराव ह्मणून चांगला शूर, मर्दाना, जिव्हाळ्याचा मनुष्य होता. त्याला मीं सांगितलें कीं, बाईबरोबर विसा-

वा घेत यावें. दुराणी दृष्टीस पडतांच कठोर अंतःकरण करून बाईचे दोन तुकडे करावेत. याप्रमाणें तीन कोस पालखी घेऊन भोई पळाले मग हुल्लड शांत झाली. मी एकीकडे–नारोशंकर एकीकडे—साबाजी शिंदे एकीकडे—याप्रमाणें दिल्लीपासून कच्चे ऐशी कोस, कोटपुतळीपावेतों, बाईचे व माझे हाल झाले. तेथें आल्यावर तमाम डोंगरांत सांडणीस्वार पाठवून सर्व लष्कर जमा केलें.

**मल्हारराव**—झालेली गोष्ट आतां येत नाहीं. पुढें तजवीज काय करावी ? सुरजमल्ल जाटाकडून सांडणीस्वार आला आहे. त्यानें अशी बातमी आणली आहे कीं दुराणी फक्त तुह्मांवर घोडेस्वार घेऊन चाल करून येणार आहे. करितां तुह्मीं स्वस्थ बसूं नये. तुह्मी तर असे जायबंदी झालेले. दुराणीची दौड भारी. सहज कच्चे चाळीस कोस चालतात. तुमची निभावणी लागणार नाहीं. करितां तुह्मी आह्मी बुणगे व बायकामाणसें असे चमेलीपार होऊन जाऊं.

**जनकोजी**—तुम्ही वडील माणूस आहां, मीं मुलानें तुम्हाला काय सांगावें ? तुम्ही बुणगे व मुलेंमाणसें घेऊन जावें. मला पागलाच्या मागें जीव ठेवावयाचा नाहीं. जेथें काका मृत्यु पावले तेथें हा देह ठेवणार. हीच माझी प्रतिज्ञा.

**मल्हारराव**—असें ह्मटलेंत तर आमचे उपाय हरले. ठीक आहे. मला तरी किती पन्नाशा जगावयाचें आहे. दस गेले आणि पांच राहिले. मूल होऊन तुह्मी एवढी हिम्मत धरतां, मग मी तरी दुसरा विचार मनांत कशाला आणूं ? तुह्मी आह्मी फौजेंत एकत्र राहूं. बायकामुलें बुणगे यांनां माळव्यांत लावून देऊं. आपण दुराणी भोंवतीं गनीमी काव्यानें सडे राहून गिलचे हारीस आणूं. चला तर बायकामूलांची समजूत करून आतांचे आतां त्यांची रवानगी करून देऊं. ( **मल्हारराव जनकोजीचा** हात आपले हातांत घेऊन त्यास आंत घेऊन जातो.)

---

## प्रवेश ३ रा.

### स्थळ—उदगीर रणांगणानजीकची झाडी.

[ भाऊसाहेब. ज्यांचीं सर्व वस्त्रें रक्तानें भरलेलीं आहेत. व तलवार भरलेली आहे असा प्रवेश करतो. ]

**भाऊसाहेब**—( मोठ्या ऐटीनें ) अहारे बहादर ! याचें नांव गाजो ! जिकडे तिकडे अशी रणधुमाळी माजवून दिली कीं मोंगला-चा नुसता चुराडा चुराडा उडाला. एकदिल पांचशें माणूस दिमतीस ठरला नाहीं. सर्व रिसाल्याचा गोल किल्ला बांधून तोफांचा आराबा देऊन एक फेर झाडली मात्र, तों मोंगलास असें झालें कीं, " अय खुदा जान बचाव " वीस हजार चढ्या घोड्यांनिशीं दौड करून निजामाच्या तोंडावर जाऊन पडलों. एकसा कत्तल करून रक्ताचे पाट चालविले. तलवारींचा खणखणाट असा उडवून दिला कीं, मोंग-लही पण आपल्या ठिकाणीं अगदीं चूर झाला. झुंजतां झुंजतां खासा स्वारीच्या हौद्याला जाऊन भिडलों. मग दस्तरुमाल उडवून मला इशारत दिली कीं आतां कतल बंद करावी. मोंगल असा कधींच शिकस्त झाला नाहीं. आणखी चार घटका जर अशीच टक्कर दिली असती, तर हे जंगबहादर पार गर्दीस मिळून गेले असते. त्या बुढ्या निजामाला वाटलें होतें " एक बाजी और सब पाजी " बाकोच्यांत काय अवसान आहे. पण या भाऊची जवामर्दी काय अजमावलीस ? खरोखर आमची ही हिंदुपदपादशाहीची टोलेजंग इमारत उभारणारा-महाराष्ट्रसिंह, या यवनाच्या नरडीचा घोट घेणारा, ज्यानें, तानाजी मालुसरे, बाजी फसलकर, येसाजी निकम असल्या घोंगड्या वीरांस अफजूलखा, झुलफिकरखा, रस्तुमखा असल्या बादशाही मंडळीशीं झुंजायाला लावून त्यांची खा खा मोडली; आणि इमाम दांडग्या अव रंगजेबासारख्याची मगरूरी जिरवली, तो जर आज हयात असतां तर या भाऊनें आज त्याचेकडून " शाबास " अशीं अक्षरें मिळवून घेतलीं असतीं. आमचे काका रावबाजी, किंवा वसईच्या किल्ल्यांत आपलें मुंडकें तरी पडावें म्हणून उमेद बाळगणारे आमचे वडील चि-

मणाजीआप्पा, यांनीं दिल्लीपावेतों स्वाऱ्या करून सरदेशमुखीचे हक्क संपादन केले, अटकेपर्यंत आपला दरारा बसविला, त्रिंबकराव दाभाड्यासारखा तलवारबहादर छातींत गोळा मारून ठार केला, परंतु दक्षिणेंतला हा मोंगल सफेजंग उडवून दिला नाहीं. त्यांनीं मोंगलास रहीमादिल दाखविला. ही त्यानीं मोठी चूक केली. आतां हा भाऊ तुमचा प्रत्यक्ष काळ जन्माला आला आहे. मी आतां सल्ला करीन काय ? शिल्लक राहिलेली तुमची फौज उद्यां लुटून दुरुस्त करितों. माझे मोठमोठे सरदार, माझ्या जिवास जीव देणारे दोस्त; बरणाजी मोहिते, केशवराव पानसे, तोफेचे गोळे लागून ठार पडले. त्यांचा सूड यथास्थित उगवीन तरच नांवाचा भाऊ. ( विचार केलासे करून ) बरें पण अजून आमचे शालक बळवंतराव मेहेंदळे कसें नाहीं आलें ? पण हा—राजाराम—हां—तोच-हा-हा कसा इकडे ? ( राजाराम प्रवेश करतो व भाऊच्या हातीं पत्र देतो )

**भाऊसा०**—कां राजाराम, आमचे दत्ताजी शिंदे, जनकोजी शिंदे, बरे खुशाल ? बोलत कां नाहींस ? डोळ्यास पदर कां लावतोस ?

**राजाराम**—सरकार पत्रांत सर्व कच्चा मजकूर आहे.

**भाऊसा०**—( पत्र वाचतो ) अरेरे !! हें मी काय वाचतों आहें ! "अबदल्ली गिलच्या नजीबउद्दवला रोहिला, आणि सुजाउद्दवला अशा तिघांनीं दीड लाख फौजेनिशीं दिल्लीनजीक दोन कोसावर चाळीस हजार फौजेनिशीं दत्ताजी शिंदे होते, त्यांच्यावर चाल केली. चोहोंकडून वेढा पडला. दत्ताजीनें जातीनिशीं बहुत तलवार केली. इतक्यांत छातीवर गोळी लागली. कुतुबशहानें दत्ताजीचा मस्तक लाथेनें तुडविला. आणखी 'अबदल्लीची बोलबाला' असें ह्मणून कंबरेचा सुरा काढून दत्ताजीचें कंठनाळ चराचरा चिरलें. हें सगळें कारस्थान त्या निमकहराम नजीबखानाचें आहे. दत्ताजीबरोबर त्यानें कपट केलें व अबदल्लीस बोलावून आणून विश्वासघात केला. जनकोजी शिंदे यांचे दंडास गोळी लागून ते फार हैराण आहेत. हजारों लोकांची कत्तल उडाली आहे. करितां साहेबीं देख-

नपत्र मदतीकरितां लाख फौज रवाना करावी. सुभेदार मल्हारराव होळकर आम्हास कोटपुतळी मुक्कामीं येऊन मिळाले आहेत. धन्याचे सेवक गांजले आहेत. यास्तव लक्ष मनसुबे एकीकडे ठेवून अगोदर फौजेची कुमक करणें. " काय आज दिवस उगवला- उद्गीरच्या लढाईत झालेली फत्ते नारायणाला सहन नाहीं झाली. काय मी आनंदाच्या भरांत होतों!! दुधानें भरलेल्या पात्रांत जसा कोणी मद्याचा थेंब टाकावा, किंवा विजयश्रीनें सतत माळ घातलेल्या वीरशिरोमणी धनंजयास जशी अभिमन्युवधाची बातमी कळावी तसें झालें. शिंदे, होळकर म्हणजे आमचे पंचप्राण—मल्हारराव होळकरांनां मी काकासाहेब म्हणून हांक मारतों इतकेंच नाहीं पण, प्रसंगोपात् जर ते खप्पा झाले तर, माझी तर काय पण खुद्द नानासाहेबांची सुद्धां पुढें बोलण्याची सुरत नाहीं. कारण ते आम्हांला आजोबा शोभतात. रणमैदानांत दत्ताजी मला केवळ पाठचा भाऊ वाटे. शिवाजीचा 'तानाजी' आणि भाऊचा 'दत्ताजी' असें नेहमीं लोक मला म्हणतात. पेशवाईची ही एवढी अवाढव्य इमारत उभारण्यास कारणीभूत कोण ? शिंदे आणि होळकर. जनकोजी पत्रांत लिहितात ' सेवक गांजला आहे ' अरे ज्याचा सेवक वैऱ्यांनीं गांजला तो धनी कसचा ? आतांचे आतां रघुनाथरावाला हिंदुस्थानांत रवाना करून, नजीबखान रोहिला, अबदल्ली गिलच्या आणि तो अयोध्येचा नबाब, होते किंवा नव्हते असें करून टाकतों. आतां निजामाबरोबरचा सामना तूर्त तहकूब ठेविलाच पाहिजे. राजाराम, तुम्ही जवळ असतां असा प्रसंग कसा आला ?

**राजाराम**—सरकार, पाटील घायाळ झाल्यावर राघोबा पागे यांनीं मला कुतबशहाजवळ आश्रय मागण्याकरितां पाठविलें, त्यानें आश्रय देण्याच्या ऐवजीं असा गळा कापिला. त्या वेळीं मीं व राघोबानीं पुष्कळ मिन्नतवारी केली. कीं एक करोड रुपये नक्त देतों, पण तो रहिमदिल झाला नाहीं. हें सगळें कृत्य त्या नजीबाचें.

**भाऊसा०**—अरे असले भुरटे रोहिले, यांच्यावर स्वारी करणें म्हणजे आमच्या इभ्रतीला शोभत सुद्धां नाहीं. यांनां धर्मयुद्ध कशाशीं

खावें, याची कांहीं कल्पना तरी ? यांचीं डोकीं, मारे तंबूला तणावे देण्याच्या मेखसूंखालीं फोडून टाकलीं पाहिजेत. परवांच्या मोहिमेंत दादासाहेबांनीं जर त्या नजीबाला पुण्यास आणिलें असतें तर फार चांगलें झालें असतें. तेथें त्याची रग जिरवून टाकिली असती. दत्ताजीचा मस्तक—ह्या पेशव्याच्या दत्ताजीचा मस्तक—कुतुबशहानें त्या नजीबाच्या वस्तादानें लाथेनें तुडवला आं! त्या वेळीं त्याला पेशव्यांची जरब कांहींच वाटली नाहीं काय? बरें आहे, पाहून घेतों. आणखी हिंदुस्थानची काय खबर आहे ?

**राजाराम**—कोटपुतळीहून मी निघाल्यावर मजकडे सांडणीस्वारानें अशी खबर आणिली कीं, सुभेदार मल्हारराव होळकर व जनकोजी शिंदे मारवाडांत गेले. परंतु दुराणीनें त्यांचा तेथें पाठलाग केला. गिलचे तेथें आल्याबरोबर मराठे पानपत कर्णोलकडे गेले. मोंगल तिकडे जातांच मराठे दिल्लीस पोहोंचले. मोंगल तेथें येतांच मराठे आग्र्याकडे वळले. मोंगल आग्र्यास येतांच मराठे जयनगरकडे वळले. तिकडे मोंगलाची दौड पोंहचतांच हे उदेपूरच्या सुमारें गेले. याप्रमाणें गनीमी कावा करून गिलच्या हारीस आणावा म्हणून शिंदे होळकरांनीं बेत केला आहे. परंतु ह्या हुलकावण्यांचा कांहींच उपयोग झाला नाहीं. दुराणीची हिम्मत खचली नाहीं. त्यानें शिंदे होळकर यांनांच उलटें पिटून पिटून दमवून टाकिलें. गेल्या फाल्गुन शुद्ध १४ स मराठे दिल्लीस येऊन पोहोंचले. नंतर मोठा मजल करून यमुना उतरून पौर्णिमेच्या दिवशीं ते शिकंद्राबादेस आले. शिंदे, होळकर यांच्या फौजेनें तें शहर लुटून फस्त केलें एकदम जाऊन शहरावर घाला घातला. अतोनात लूट मिळविली. भांडीं, वस्त्रें, मैदा, तांदूळ, साखर, तूप, यांला कोणी पुसेनासे झाले. इतक्यांत एकाएकीं सुरजमल जाट याचा सांडणीस्वार धांवत आला. त्यानें बातमी आणली कीं, दुराणी-ची दौड दिल्लीनजीक यमुना उतरून अंतर्वेदी प्रांतीं तुमच्यावर चाल करून येत आहे. तुम्हीं देखतचिठ्ठी कूच करणें.

**भाऊसा०**—यानंतर शिंदे होळकर यांनीं काय मनसुबा केला याची कांहीं तुह्मास खबर आहे काय ?

**राजाराम**—होळकर यांच्या फौजेचें ह्मणणें असें पडलें कीं, हा वक्तपावेतों आह्मी तुमच्या आवईवरच पळत होतों. दुराणी कांहीं आस्मान् फाडून आला नाहीं. आह्मीं त्याचें तोंड पाहिलें नाहीं. याप्रमाणें शिंद्याच्या फौजेची हेटाळणी होळकराचे लोक करूं लागले. जनकोजी शिंद्याचे कानीं ही बातमी जातांच त्यांनीं होळकरास विनंति केली कीं, तुम्हीं एक वेळ लढाई करून पाहणें, आमच्या फौजेनें फार खस्त खाल्ली आहे. दुराणी आल्यावर झाडास बांधिले तरी झाडच घेऊन पळून जातील. एक पळाल्यावर दुसऱ्याची हिम्मत कमी होते. करितां या प्रसंगीं तुम्हींच दुराणीचा मुकाबला घ्यावा. मग मल्हारराव यांनीं आपले दिवाण महिपतराव यांस फौजेची बक्षिगिरी त्यांचेकडे सुपूर्द केली, व आपण खासा जनकोजी शिंदे बिमार म्हणून त्यांच्याबरोबर आग्र्यास निघून गेले. दुसरे दिवशीं उजाडतांच गिलचे येऊन पोहोंचले. आपले लोक सावध होते. गंगोबातात्या व महिपतराव यांनीं कडनिकड करून पुढें सरसावून एक वेळ गिलच्यावर घोडे घालून घाव केला. गिलच्या मागें सरला. क्षणभर बरीच चकमक झाली. घायास हजार मनुष्य ठार पडतांच होळकराची खानदेशी फौज आग्र्याकडेस पळूं लागली. दुराणी केवळ कठोर जात 'गो घास खाती बताव अल्लाका डेरा' असें म्हणून डोकीं उडवीत चालले. महिपतराव दिवाणाचें शिर कापून नेलें. ह्याप्रमाणें शिंद्यांच्या फौजेस हांसणाऱ्या होळकराच्या जमियतेची पोळजत्रा उडाली. एवढीच हकीकत मला समजली, यापुढें मला समजण्यांत कांहींच आले नाहीं.

**भाउसा०**—बरें आहे कांहीं हरकत नाहीं. या पावली जाऊन आमचे शालक त्या पलीकडच्या डेऱ्यांत असतील, त्यांनां ताबडतोब इकडे पाठवून दे. ( राजाराम जातो. )

**भाऊसा०**—'गो घास खाती अल्लाका डेरा बताव' आतां तुम्हीं आम्हाला अल्लाच्या डेऱ्यावर नेतां कीं आम्ही तुम्हाला यमाच्या घरीं नेतों, तें लवकरच समजेल. दत्ताजी माझा दिलदार दोस्त, लाखों रियासतीचा पालनवाला, त्याचा मस्तक त्या बदमाष 'कुतबशहानें अहमदशहाची बोलबाला' म्हणून कापून लाथेखालीं तुडवला; हें ऐकतांच

ज्याला त्वेष चढत नाहीं, अविंधावर करकरा दांत खाऊन जो आपल्या धगधगीत समशेरीला हात घालीत नाहीं, उसण्याघाई झुंझून भयंकर सूड उगविण्याची जो प्रतिज्ञा करित नाहीं, तो जातीचा अस्सल हिंदुच नव्हे. अशा प्रकारची दत्ताजीची झालेली मानखंडना–दत्ताजीची कशाची–खुद्द पेशव्यांचीच, ऐकून काळीज चर्र झालें. काय करूं संताप सहन होत नाहीं ? पांचशें कोसावर कुतुबशहा दूर पडलास नाहींतर तुला कच्चा खाऊन टाकला असता. हे सूर्यनारायणा आज बारा वर्षे सारखें अर्घ्यप्रदान करून रोज तुला एक हजार वेळ नमस्कार घालून हें शरीर केवळ लोखंडाची गोटी बनविली आहे. याच पुण्याईच्या जोरानें माझी ही भयंकर प्रतिज्ञा तडीस जाऊं दे. ती प्रतिज्ञा हीच कीं, " कुतुबशहाचा मस्तक लाथेच्या ठोकरीसरसा उडवीन" तरच हें क्षात्रबीज, आणि तरच अप्पासाहेबांच्या पोटचा. नाहींतर, ही जीभ छाटून टाकीन–प्राणत्याग करीन–तोफेच्या तोंडीं बांधून घेऊन स्वतःला ठार करीन–आणि अंतीं रवरवनरकांत जाईन. हीच माझी प्रतिज्ञा आणि आतां वर्तन याच बाण्यावर. जशी परशुरामानें ही पृथ्वी निःक्षत्रिय केली, तसेंच मी हें भरतखंड निर्यवन करीन, तेव्हांच विश्रांती घेईन. हे नरश्रेष्ठा छत्रपति शिवाजीमहाराजा, या यवनांचें निर्दालन करण्याला तुझा अतुलप्रताप, तुझें तेज, आणि तुझी मर्दुमकी या माझ्या अंगांत शिरूं दे. आणि या तुझ्या दासाच्या हातून गिलच्यांनां त्राहि त्राहि होईल अशी कडक शिक्षा मिळूं दे, सूड ! सूड !! सूड !!! ( तलवार उपसून पडद्यांत जातो. )

[ पहिला अंक समाप्त. ]

# अंक दुसरा.

## प्रवेश १ ला.

**स्थळ**--शिकंदराबाद येथील नजीबखानाचें घर.

( नजीबखान प्रवेश करितो. )

**नजीब०**—वल्ला, ये अलं दुनियेमे मेरे सरिका कम नसीबभि कोई न होगा, और मेरे सरिका किसीका तकदीरभि चमका न होगा. मेरे सरिका गरीब पर्वरभि कोई न होगा, और मेरे सरिका तवंगरभि कोई न होगा. मेरे सरिका मुफलसीमे गिरफ्ताराभि कोई न होगा, और मेरे सरिकी चमनूभि किसीने नहि पाया होगी. असदगफरुल्ला ! ! च्यूं के जिसवक्त मुजे दादासाहेबने गिरफ्तार करके सुभेदार मल्हारके सुपूर्द किया, और जिसवक्त, ये बंदा साजक रोटी लेके दत्ताजी शिंदे के पास गया, उस्वक्त मुजकू नमकहरामिके रायसे, उस दत्ताजीकू फुसलाकर उसके ह्यांसे भागजाना मुमकिन नथिथा, और लाजमभि नथिथा, के मय दुनियेके पडदेपर लोगोंकू नजर आंऊ. मगर ये नजीबखानने पर्वरदिगारके कुद्रतसे, अपना सगाभाई सुलतानखानकूं, जनाब अहमदशहा अबदल्ली सलतनद पादशहा खंदारके तरफ भेजा. बडीबेगम साब मलकाजमानीकी सुरतपाक बेटी, शेहजादी चंदाजमानी, आफताफ बमूजब् अस्मानमे चमकनेवाली, गोया एक बुलबुले परिंदा, शेहजादे तंबुरशाहा, फर्जंदे अहमदशहाकूं देनेका ऐकरार किया. और मयनें ये ऐन दिल पसंतीका काम किया हय के वजीर गाजीउद्दीनकी भेयन बीबी मर्जीना, जिसके उपर ये दीनदवलत तसदूक हय और उसकी फुपूभि मयने लाया हय. अहारे प्यारी मर्जीना, तेरे बुल्फतमे ये नजीबखानकी अब जान जाती हय. तेरेकु हर तऱ्हेका मेयने जवाहिरात लाया हय. और तेरे पिसवातके वास्ते मयने येक हीराभि लाया हय.

**मर्जीना**–( खोलींतून जोरानें बाहेर येते. ) अय कंबक्त, नमक-हराम, पाजी गाजी नजीबखान, ये तुने क्या किया? तू और तेरे उस्ताद् शरीफने दत्ताजी शिंदेका सर काढलाया. पागल क्या तेरी जवामर्दी? और क्या कुतुबशा रहेमादिल्? तोबा तक्सीर! तोबा तक्सीर!! ये क्या हुवा? शुक्रताला नजदीक् गंगामाताकूं बिल्फैल् मय येक पूल बन्वाताहूं और ऐसी हालतमे मुजे खुला करदो, ये एकरार तूने किया और उस्से तूने बेमानी कियी. अल्ला तेरा कबू न भला करे.

**नजीब०**—अय् मेरी प्यारी मर्जीना, तुजे अपनी जान् प्यारी हय् या नहि? सारी हकीकत सुनके, तूने ये गाजी नजीबखानकूं पाजी, और पागल कयना था. तू क्या दिवानी हय? तु मनमे क्या सोच किया हय्? तेरे नाजुक जोबनपरसे नूर टपकरहा हय्. मयने तेरेवास्ते लाखों रुपयेका जवाहिरात लाया हय्. अयखे माषुकके हातका एक बोसा. लेताहूं ( तो तिचा हात धरावयास जातो ती त्याच्या तोंडांत मारते. )

**मर्जीना**—मेरा भाई वजीर गाजिउद्दीनखान. खानदानसे तुजूसे बढजान् उसने. मेरे वास्ते देखा हय एक दिलदार खाविंद समशेर बहाद्दर उस्का नाम, उसके उपर मेरा दिल हय् कुरबान, आगरचे आफ्त ये जानपर आयि, तों मय न हुंगी बेमान, अय गद्दार ये तू हर्दम यकीन् जान्.

**नजीब०**—क्या मीठी मीठी लंबी चवडी मय् न सुनता तेरी बेजाबात, तू हय मेरे हात, मुजे मालूम हय तू नेकजात, बडी दिवानी, तू नकर मेरी सात, ज्यारी खबरदारी करके फिर न मान मेरी बात, जैसा करना वैसा भरना. दुनियेमे ठैरा हय हरगिजबात.

**मर्जीना**—क्या मेरे उपर तेरा येहसान् हय. तों मय तेरेकूं दिलजान समजूं, तू अदमी हय या हयवान? तेरे हातसे मय् पायी हूं ये जिन्दान्, अय् बेमान तू क्यंव खोता हय अपनी जान्, मुजे क्या तू समजता नादान?

**नजीब०**—अय परीजान, तू ये मेरा कहना मान, मेरा दिल हय परीशान, तेरे हुसनपर मयहूं कुरबान, बार बार जाना जाना कहेना ये हय तुफान्, मत्कर दिलगिर तू मेरी पयछान्.

**मर्जीना**—अय बत्कार तेरे जबानपे मेरी कट्यार, और तेरे नामपर मेरी पयजार, क्या बद्मामलेकी बात् तूने निकाली अक्सर, तेरेकू इतना झट्का पट्का मगर तू हय् बेतौर. खयर मय आब चली जाती हूं, चाहे उदर, तूजे चाहीये वैसा तू कर.

**नजीबखा०**—अये गुलजार, ये तेरे गुलामका सर, बेकदर अगर तुने खंजरसे सफा करकर दूर किया तोभी, मे अकसर रख-ताहूं तेरे हुसनपर नजर, मैंहूं तवंगर, तेरे भाईका मुझे नई डर, ये सरासर इनकार और बेकरार है के तु नई पसंत करती फिद्वी गारका जिकूर.

**मर्जीना**—लाहोलवला, इल्लाबिल्ला येक्या बला हैके नजीब-खान तु मेरे मकान मे गुलाम होके मेरेपर हमला करता है? खैर तेरेकू इतनाइ इतल्ला सूनवाती है, के मौल्ला मेरी रसमेसे बालाबाल जान् बनावेगा, और मै अपने दूलाकू खैरसल्ला मिल जाऊंगी मै क्या तेरी बालादस्त हूं तो तूं मेरेपर अनलाफैल्ला और सल्ला मसलत् करता है? तेरेकू गल्ला भर देती हूं, मगर वल्ला तूं मुझे छोड दे.

**नजीब**—आये जानी, तूं लालोकी लाल है, गुलशनमे गुलाबका फूल है, तु मुजपर मायल है, तेरे उल्फतमे दिल मेरा मषगूल है, गिरफ्तार है झूलरे दिलमे. मैक्या हमाल है क्या हिलाल है तो आये चंडाल तू मेरा इन्तकाल मखलूख् होके खियाल् न करके करती है! आय् परिये क्या जंजाल है. इसे बेहत्तर अ-गर मै जलजायतो.

( इतक्यांत अहमदखान लंगडा पठाण व कुतुबशहा नजीब खानास पादशहाचे दरबारांत घेऊन जाण्यास येतात, त्यांस पाहून नजीबखान लाजतो.)

**अहमदखान**—ये क्या गुल् मचाई हय् येक्या मुरगा मुर-

गीका झगडा हय् क्या ? उस्ताद् आये हये, उन्कू तसलीम् ब-जाव्, और फौरन् बाद्शहाके दरबारमे चलो.

**मर्जीना**—ये गद्देकू और दोन गद्दे मिले. आच्छा लेजाव् इस्कू शहाके तरफ, और फिद्वीका मारुजा सुन्वाव के, ये बद्माष् कम्-तरीन् नजीबखान, वजीर गाजीउद्दीनके भेयन् पर निम् दिन् पल् छिन् अमलाफयला करनेका इरादा रखना हय्.

**कुतुब**—अय् दिवानी चुप्. नेरे सारिक्या बांदिया हमारे ह्यां खूप् हय्.

**मर्जीना**—मय् जानती हूं, के तूं नजीबखानका उस्ताद् हय्. मगर तू ये खूब् समज् के, शिंदा जनकोजी—जिस्के चचेका तूने गर्दन चाक् किया—वो तेराभी सर कलम् करेगा. नहितो मय् उस्कू सामील हूंगी. फिर जो बला हमरे आयगी सो आयगी.

**कुतुब**०—अये लवंडी, एक मूमे तमंच्या लगाऊ तो मुफत् मरजायगी.

**अहमदखान**—अये अहैमक, औरत लोगोंपर हात उठाना ! क्या बेवकूफकी बात है ! ( नजीबखान व कुतुबशहा तिला मार-ण्याकरितां ओढाताण करितात; लंगडा पठाण तिला सोडविण्यास जातो तो खालीं पडतो.)

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ—शिकंदराबाद येथें दिलेल्या छावणींतील तंबूमध्यें बादशहाचा दरबार.

( दरबारांत वजीर शहावलीखान, सुजाउद्दवला, नजीबखान, कु-तुबशहा, समयतखान कनलबाज, अहमदखान लंगडा पठाण, उमरावगीर गोसावी इत्यादि तमाम सर-दार बसले आहेत. )

**प० चोप०**—मसलसमे बादशाकी आमद आमद है.
सरदारोंकी फतेमंदी होके आमद आमद है.

मौफिलमे सब परियोंकी आमद आमद है.
सिलसिले इनाम बक्षिस देके सबको आम०
रंगारंग बनके सिपाई आमद आमद है.
शराफ पीके दिलखुशीमे आमद आमद है.
दरबारका मै क्या बयान करू आदनासाइनसान.
जिसमे परवरदिगार खुष है वोहां आमद आमद है.

निगारुबरू अहमदशा अबदल्ली सलतनतके आकीने दौलत पादशा खुदहार तखपर गेशनहे, आइबसे, तपीजसे, हुश्यार रहिना.

दु०चो०—तखनसीन पादशा मुबारिक होवे,
इनसाफ देने गरिबोंको मुबारिक होवे,
बदनाषको सजा देने मुबारिक होवे,
ख्वाबमे कुसूर न करना मुबारिक होवे,
दरकार किसिका न रखने मुबारिक होवे.
तलवार गनीमोपर चमकाते मुबारिक होवे,
सबजाहांमे जाहिर है इनके नाम इनका,
परवरदिगारका कबुल है मुबारिक होवे,

**बादशाहा**—अय मेहेरे खुदा, ये अदनासा इनसान तेरा निहायत येहसान मंदहूंच, वजे इसका येहय् के जब हम जनाबे नादीरशहा पादशहाके नजदीक खजानदरबास थे तब हरयेक मुकाबलेमे हम उसकी तरकीब, औरबारीक, गोया येक सबके मानिंद पढ चुके हये. नबाब मनसूर अली, सफतरजंग साहेब, हमारे जनाब सुजाउद्दवलासाहेबके बाबाजान हमारे बडे मेहमान थे. एकवक्त हमारे उपर वे गजब गुस्से मे थे उसवक्त हम देहलीसे मारे गमगीनीके वापस गये. फिलहाल हमसे जनाब सुजाउद्दवलासाहेबने सब सरदार लोगोंके रूबरू ये कुबूल किया हयके, मय गनीम लोगोंकी तरफदारी कभी नहि करेगा, और मय समजताहूं के एहलेइसलाम लोगोंकू येई लाजीम हये. ये हुनूद लोगोके जंगके मौकेमे और मुकाबलमे, जो कोई शक्स हमारी तरफदारी करेगा, और हमारे हुकमकी तामिली फौरन बजायगा और हमसे नेकजात रेहेगा, उसकू हम मिसल बिरादरोंकी समजेंगे और उसका दरजा बढायेंगे.

**वजीरशहा**—जनाबेमंद ये फिदवी वजीरशहावलीखान जनाबका खानाजाद कदमबोसी करके ये मारुजा कर्ता हय के मय भी जनाब सुजाउद्दवलासाहेबकूं मिसल फरजंदोके समजाहूं. उनकी मिजासमो बारिक तो अब सब लोगोंकी उसमे गुंजायश. मयने तमाम जमीयतमे ये हुकुम फर्माया हय के जो कोई शक्स जनाब सुजाउद्दवलासाहेबके छावनीमे जाके उनके रिसालेके लोगोंकूं सतायेगा ओ मुफतमे मारा जायेगा.

**सुजाउद्द०**—जहांपनहा ये बंदा सुजाउद्दवला हरयेके हुकुमकी तामिली बजावेगा. मगर कुसुर माफ होगये तो मय ये मारुजा कर्ता हय के मेरे वालिद जनाब मनसुरअली सफदरजंगसाहेब, सुभेदार मल्हारराव होळकरके माताहतथे. बलके एक दफे खुदाहुतालाने अयसा मौका लायाथा के हमारे बाबाकी जान जानेका वक आयाथा मगर होळकरके येनायतसे वे बचे. ये जंग मे मय आपकी तरफदारी करूं, तो उनसे बेमानी होनी हय. एक दफे मय गनीमोंका गुन्हेगार ठेरा और आपकी ये जंगमे फतेमर्दी न हुई तो मय और मेरी वालिद और मेरी तमाम रियासद गनीमोसे कतलकमा किये जायेगी. इस बारेमे सोच करना मुनासिब हय सिवाय शुक्रखुदाके मेहेरनजरसे फते हुई तो ये बंदा दिलमे खायश रखनाहय के देहलीकी वजिरात करूं.

**खुषमस्कऱ्या**—ये इनसान इसके बाबाजानकी जान जानेका मान आयाथा तो नादान आब भुलजाके बेमान होके, कदरदान शिंदे होळकरपर मानीन्द शयतानक फोरन जाके बेगुमान उनकी गर्दन मारनेका छान छान पयछानके बेन निकलना हय. ये चिराकदान हय या पिकदान हय ? हिंदुस्थानमे ये मेहमान आनके सब परिस्तानका ये नादान कबरस्तान बनाता हय. और देहलीकी वजिरात एकजात रात बेरात करनेकी शबेबरातके मानीन्द खाविंदकूं फर्माबरदारी करता हय. वजिरातके बदला उसकू वकिलात दिला दो.

**नजीब०**—गरीब पर्वर. नकुसीर माफ कीजिये. हमारे उस्ताद जनाब कुतुबशहाने जिस वक्त दत्ताजी शिंदेकू नेसतनाबूत किया

उस दिनसे सब लोगोंका यकीने कामील हुवाहय के ताय मुदत एहले हूनूद लोगोंने अमूला फयला किया. मगर अब कियामत तक इसूलाम लोगोंकी दिनबदिन, खुदाहुताला, कलम जारी करे. तमाम काफर-लोग हिंदुस्थानमे भरे हुवे हय. उसमेभी गनीम अकूसर हमारे उपर बडा धूम मचाते हय. इनकू सजा होना जरूरी हय. हुजूरेपुरनूरके हुकूमे शरीफ्के तामिलीके लिये, वीस हज्जार जंगी जवान पठान चाऊसलोग और रोहिला लेके गनीमके पीटलगा तो गनीम मारवा-डमे घुस गये. हम जब उनके पीछलगे तो गनीम पानपत कर्नाल तरफ गये. हम जब उनका मुकाबला लेनेके वास्ते गये तो ओ भागे देहलीकुं. हम पिछे लगे तो गनीम भागे आग्रेके तरफ. हम जब आग्रे-कूं लोट गये तो शिंदा होळकर भागे मानिन्द कुत्तेके जयनगरके तरफ. हम जयनगरकू गये तो गनीमने देखा उदेपूर. इसी हालतमे, आखार उनकू हमने शिकंदराबादके नजदीक सामना दिया. हमने येकी हंबलेमे और लेहजेमे मेहरतराव पलसीकर, मल्हारराव होळकरके दिवानका सर काट लायाहै. ओ मय आप पर्वरदिगारकुं नजर करता हय. सिवाय ये अर्ज हयके जनाबेमदके फरजंद शेहजादे तैमुरशहा देहलीमे तक्तनशीन हो गये. और तमाम अर्कानि दौलत हिंदुस्थानके खासखा मालिकबने जनाब सुजाउद्दवलासाहेब, उनकी वजिरात करे, और ये बंदा नजीबखान अदनासा इनसान उनकी बक्षीगिरी करे.

खुष०--जनाबे मंद ये बहोत अकलमंद और दानीषमंद और दौलतमद हय के, ये दौलत के नशेमे धुंद होके फंदाफितुरी करनेमे फतेमंद हय. खुदावंत ये नजीबखानने इसके आयनदीलपसंतीका काम किया हय के गाजीउद्दीनकू रजामंद होके, उसकी भयन बीबी मर्जीना बहोती दिलपसंन बलके पसंती पसंत, आपने घरमे लाके रखा हय. ये मगरूर बेकरार बदनूर बदस्तुर नजीबने आपकू फुस-लाकर गनीमकी जंजीर डालनेकेवास्ते ये काम जरूर किया हय. चुनाचे इसने मानाथा दत्ताजी इसका बिरादर और होळकर इसका पिदर, और गाजीउद्दीनकी फुफू इसकी मादर, इन तीनोकूं संजरसे

सफा करनेका येकरार इसके पीरोमुरषद्के रूबरू इसने किया हय. बक्षीगिरीकी उस्तवारी करनेकी जारी खबरदारी इसकेपास क्या हय? बक्षीगिरीके बद्‌ला इसकू हजामगिरी या गुळामगिरी दिला दो.

**कुतुबशहा**--सरकारे आलि ये बंदा बंदगी करकर ये मुनू-वाई करता हय् के. हमारे चेले नजीबखानकूं मयने सब् इल्म तवारीक जुग्राफीया युक्लायद्स् बगैरा पढाया हय्. चूंके मैं उसका उस्ताद् हूं. मयने दत्ताजीका सर काट् लिया तो मेरी सान् करनेके वास्ते मेरे नजीबने होलकरके दिवानका सर काट् लिया. नजीब बडा हुशियार हय ये बातोंपर हुजूरने गौर करना.

**सैयमतखान**—तकसीर माफ. गरीबके हालूपर नवाजिस फर्मायिये. मेरा इस्मेशरीफ् सैयमतखान और मेरा किताबत् कतलबाज दसहजार-जंगी जवान नंगी समसेर हातमे धरके हार्दम् हमारे पसे पुश्त रहता हय. और जंगमे मेरा और मेरे लोगोंका अक्सर ये काम हय के एक्सर कतल कमा करना.

**खुष०**---ये सैयमतखान कतलबाज बहोती दगाबाज, निशाबाज, अफीमबाज, दारूबाज, गांजाबाज, बाजे बाजे दिलमे चंडोलबाज और हुक्काबाज तो अख्सर हय. इनका इस्मे शरीफ कतलबाजके बदला रांडीबाज रखना. बहूती मुनासीब हय. और इनकू खाज-दारकी नोकरी दियाते मदारी मदार होगी.

**अहमदखान**—हुजूरेपुरनूर जंगे हुनूदमे ये बंदेका येक् पांव् टूट् गया हय्, और् मेरेकू अहमदखान लंगडा पठान कहते हय्. ताबे-जिंदगीतक्, नहि तो मेरा दुसरा पांव कट् जायगा तब् तक् मय् जंगलमेसे वापस् न आऊंगा.

**खुष०**---ये उल्लूके भाई मशालजी लंगडा पठान इनका एक पांव टूट गया हय. व्हायूयात जंगमे क्या तेरा करज हय्, तो तूं अरज करता हयके, दूसरा पांव टूट जाय तब् मय् पलटा न खाऊं. मानीन् मेंडकके कुदी खाके ऐसा चलता हय. ( उडया मारून दाखवितो. )

**बरखोरदार०**-(एकदम घावऱ्या घावऱ्या प्रवेश करून महिप-

**तराव** दिवाणाचें डोकें **बादशहाचे** हाताचें चुंबन घेऊन त्याचे पुढें ठेवून बोलतो. ) तक्सीर माफ्. देहलीके नये फौजबक्ष जनाब्-नजीब्खान इन्की ये हुजूर अलीकू दुसरी नजर हय्. पहिली नजर दत्ताजी शिंदेके सरकी मिली. ये सबकू ऐन् खुषीकी बात् हय्. सिवाय इसके, हुजूरे पुरनूरका ये बंदा, ये सनदेसेकी सुनवाई करता हयके, आपके रिसालेमेसे दो हजार बद्माशी अफ्गान लोगोंने जनाब सुजाउद्दवलासाहेबके रियासतको ताराज् करके हजारोंकूं लूट लिया. ये बहोत बेजाबात हुई. इसबारेमे फोरन् दर्याफ्ती होना चाहीये.

**उमराव०**--ये फिदवी सों दफे आदाब् बजाकर ये मारुजा करता हय् के शिंदे दत्ताजीका सर मयनें रुपये तीन लाखकूं मोल लिया. चूनाचे मय् हिंदु होके अयसा न करू तों मुजे ये लाजीम् नहि. फिर और भगवान्ने ऐसा वक्त लाया हय के हमारे मुरब्बी सुभेदार मल्हारजी होलकरके दिवान बहाद्दर, जनाब महिपतराव बाबासाहेबका इंतकाल होके, उनका सर मुसलमीन लोगोंके दरबारमें आया. ये मुजे ऐन दिल पसंतकी बात् हयके दीन दुनयाके पर्वरदिगर आपहो. आप् चाहीयेसो मोल लेके मुजे ये सर इनाम मिलनेका हुकूम् होना.

**बादशहा**--( रागाऊन ) अये वजीर शहावलीखान अपने ये तरफदारोंकी बात निकाली के जो कोई दुराणी नबाबसाहेब के रियासतकू छेडेगा ओ मुफत मारा जायगा. मैं समजताहू के ये आपना हुकूम खाली हुवा. खैर अब हम मशवरा तलब करते हैं के हमारे बरखोरदारखान सरदारने अभी के अभी जाके वो दो हजार बदमाश बद्कारी और बदमामला करनेवाले लोगोंकू फौरन् कैद करना. उन्के नाकमे मानिंदबैलोके एक एक बडा छेद गिराकर उसमे रस्सी डालके शहरपन्हेके आतराफ पहिले तीन दफे दौडाव. बाद उस हरामजादे बदफैली लोगोंकू एकसा कतल फर्माव.

गोसाई उमराव माताहत हामारे सुजाउद्दवल्लासाहेब इनकू हुक्म होता है. और लाख रुपया इसका मोल हमे नजर करना, और ये हिंदूका सर दफनकेवास्ते ले जाना.

जनाब सुजाउद्दवल्लासाहेबकू हम जांहाआफरीका नाम लेके, ये यकीन कामील कहते है के, हमारी फतेमात गनीमोपर खामखा होनेवाली ठेरी. आपकी वालिदा बडी बेगमसाहेबके मुलाकतूके-वास्ते हाम कल सुभों आयेंगे. उनकाभी केहना मान लेगे और आपकू देहलीके वजीर अर्काने दौलत हिंदुस्थानके बनायेंगे.

हमकू येन खुषीकी बात है के नजीबखान और उनके उस्ताद सरदार कुतुबशा, दोनोने बहोत दिलावरी और जवामर्दी करके दत्ताजीका और महिपतका सर काट् लिया. बाद जंगके हाम नजीबखानकू बक्षीगिरीका मनसब आदा करेंगे. च्यूंके उनके खातरजमाकेवास्ते इस वक्त हम् खंदारसे आये है.

सेमतखान कतलबाज और अहमदखानसाहेब जो एक पांवसे लंगडे हुवे है, इनके बातोकी हमे बहोत हांसी आती हय. इनशे अल्ला हुताला अहमदखानसाहेबकी खुद्दा हुताला तन्दुरस्ती रखे, और उनके हात पाव शाबुत रहेगे. मै समजाताहू के मै दोनो-कूभी खेर सलामत देखूंगा, और बडी औहद्देदार की जायदाद उनकू इनाम देगा.

अये मेरे दोस्त सरदार लोगों, और चंद रोजसे फिर इस बारेमे आप् लोक गुफ्तगू करनेके लिये मिलेंगे. थोडे आरसेमे गनि-मोकी हालत क्या है, इस् बारेमे तालाश करना चाहिये. अजका दरबारका काम खतम हुवा. आब सब मजलीसकू इजाजत है.

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ---आंबेपडतूर येथील पेशव्यांची छावणी.

( भाऊसाहेब प्रवेश करितो. )

**भाऊसा०**—नानासाहेबांची कशी तरी रुक्सत् मिळविली. दादासाहेबांची साठ हजार फौजेनिशीं मोहिमेवर जाण्याची तयारी करायचीना? असा नानासाहेबांना सवाल केला मात्र, तों लागलींच स्वारीनें गरम होऊन खाडकन् जाब दिला कीं, "खासा

स्वारी गेल्यास आच तुटेल" ही डावपेचाची कारवाई मला समजत कां नाहीं ? नानासाहेब, एवढें धाडस फक्त आपली मऱ्हाठ्यांची बोलबोला व्हावी म्हणून करावयाचें आहे. यावर आपले तक्दीर. मृत्यु म्हणजे पुण्यांत राहिल्यानें येत नाहीं आणि उत्तर हिंदुस्थानांत सामखा येतोच अशांतला भाग थोडाच आहे ? मेलें तर कोणी वाळवून ठेवित नाहीं. असें म्हणतांच स्वारी चूप. तिकडे त्या राघूला पढवून ठेविलाच होता. त्याला विचारतांच त्यानें उत्तर केलें ! ! हिंदुस्थानांत जाण्याचा हुकूम होत असल्यास ऐंशी हजार फौजेस भरनाळबंदी द्या, शिवाय एक कोट रुपये नक्त खजीना बरोबर द्या, नाहीं तर आम्ही साफ जात नाही. "मिया रोतें कयंव्, तो हमारी सूरतायि वयसी " असले रडत राऊत घोड्यावर बसवून थोडीच फत्ते मिळणार ? मागल्या स्वारींत अठ्यायशीं लाख रुपये कर्ज करून घरीं आले आहेत. मोहिमेवर गेलें म्हणजे कर्ज करून यायचें का दौलत मिळवून आणायची ? स्वाऱ्या करतां कशाला ? बरें ! नानासाहेब याबद्दल एक चकारशब्द तोंडांतून काढीत नाहींत दादासाहेब नानासाहेबांचे सख्खे भाऊ. बडेभाई तो बडेभाई, और छोटेभाई सुभानअल्ला. " आम्ही पडलों चुलत भाऊ " सख्याभावांत आणि चुलतभावांत फार तफावत असते. वहिनींजवळ काय खलबतें चालतात, तीं आमच्या कानावर येत नाहींत कां ? बायकांच्या बुद्धीला लागून कोणाचें भलें झालें आहे ? मोठमोठे राजा दशरथासारखे मी मी म्हणणार सुद्धां फुकट प्राणाला मुकले. त्यांत यांची काय कथा ? नानासाहेब म्हणजे वहिनीचे केवळ मुठींत. बायकोच्या ओंजळीनें पाणी पिणारे. दरबारचें काम असो, हिंदुस्थानावर मोहीम असो, मोंगलांशीं सामना असो, किल्ल्याला मोर्चेबंदी करावयाची असो, वहिनीला पहिल्यानें विचारलें पाहिजे. तिनें ' हं, खबरदार ' म्हटलें कीं बसले स्वस्थ काय या लोकांचें जिणें ? आतां पुनः म्हणून या पुण्याचें तोंड सुद्धां पाहणार नाहीं. बस हाच बेत. ( **बळवंतराव मेहेंदळे प्रवेश करितो.** )

**बळवंतराव**--भाउसाहेब, कमाल झाली बोवा आपल्या सुस्तपणाची. एकदांचा निकाल करून टाकानात. आपण जाणार कीं दादासाहेब ? सगळ्या छावणींत झालें आहे कीं नानासाहेब यांचे मनांत दादासाहेबांनीं जाऊं नये म्हणून. मग तुम्ही तरी इतका आग्रह कां धरतां ? आपल्याला फुरसत नसेल, तर या बळवंतराव मेहेंदळ्याला आज्ञा व्हावी; खात्रीनें फत्ते करून येतों. या गोष्टीचा अनुभव आपल्यास आलाच आहे. परवां कर्नाटकाच्या मोहिमेंत आलों कीं नाहीं तलवार गाजवून !

**भाऊसा०**—जाण्याराहण्याविषयीं माझें ह्मणणें मुळींच नाहीं. माझें म्हणणें मी जर यांनां आप्पासाहेबांचे ठिकाणीं समजतों, तर यांनीं मला पोटच्या लेंकराप्रमाणें कां समजूं नये ? दादासाहेबांवर एवढी मर्जी बहाल आणि, माझेविषयीं असा परकेपणा ? आमच्या पाठीवर कोण आहे ? आई नाहीं, बाप नाहीं, एक बायको जिव्हां-ळ्याचें माणूस, तिला जातों बरोबर घेऊन, म्हणजे काम आटोंपलें शिवाय तुम्हांस सांगितलेंच आहे कीं; अखेर हिंदुस्थानांत जाणार मीच. ती गोष्ट घडून आलीच पाहिजे. या पुण्यांत आमचा निभाव लागणार नाहीं. आह्मी गेल्यावर मागें कांहीं कां होईना.

**बळवंतराव**—असें कसें म्हणतां ? तुमच्या जिवावर तर ना-नासाहेबांचे ऐषआराम चालले आहेत पहिल्यापासून आपल्याला जमाबंदीची माहिती, दरबारांतील कामाची माहिती, बोलण्या चाल-ण्याची शैली तुमची कोणीकडे ? एकदां आपण भाषण करण्यास आरंभ केला कीं श्रोतेमंडळी नुसती माना डोलवायला लागतात. दादासाहेबांना कारकुनीपेशां कशाशीं खावा, हें कांहीं कळतें आहे का ? त्याला नुसती समशेर आणि लढाई या पलीकडे कांहीं दिसत नाहीं.

**भाऊसा०**—अहो, परवांच्या मोहिमेचा सर्व हिशोब मीं तपा-सला, तर ठिकठिकाणचे नजरनजराणे वजा जाऊन अठ्यायशीं लक्ष रुपये लोकांचें देणें टाळक्यावर घेऊन आला आहे. आणि आ-तां मोहिमेवर जाण्याकरितां एक कोट रुपये खजीना मागतो. आमचे गुरु, रामचंद्र मल्हार, यानीं आम्हाला लहनपणापासून हाच

उपदेश केला आहे कीं, तुम्ही स्वतंत्र असावें. व्यर्थ व्यर्थ मी या भानगडींत पडलों. तेव्हांच कोल्हापुरास निघून गेलों असतों तर फार बरें झालें असतें.

**बळवंतराव**—आपल्याबरोबर विश्वासरावाला देणार आहेत अशी बातमी आहे. म्हणून आमच्या घरची मंडळी सांगत होती. नानासाहेबांचें म्हणणें असें पडलें कीं भाऊसाहेबाला मोहिमेवर एकटें पाठविलें तर लोक मला काय म्हणतील ? अशी कांहीं बातमी आहे.

**भाऊसा०**—ठीक आहे, बहुत बेहत्तर, विश्वासराव आला तर उत्तमच झालें. दिल्लीचे बादशहा, आणि निजामासारखे किर-कोळ नबाब शेंकडों वेळां दांतीं तृण धरून अह्मां महाराष्ट्रवीरांना-—आम्हां मराठ्यांना—शरण आले आहेत. या खेपेला दिल्लीचे तक्त पालथें घालून तेथें ब्राम्हणबादशाहीची टोलेजंग इमारत उभारतों. सर्व राजकारभाराची जबाबदारी घेतों मी आपल्या शिरावर. या भरतखंडांत एकछत्री राज्य करून टाकितों, त्या शिवाय विश्रांति घेत नाहीं. आतांचे आतां फौजेची कलम जारी करा. कमींत कमी दीडलाख करड्या फौजेची भरती येथले येथें झाली पाहिजे. दमाजी गायकवाड, यशवंतराव पवार, आमचे बंधु समशेरबहाद्दर. इब्राहिमखान गाडर्दी, सोनाजी भापकर, तुकोजी शिंदे, महादजी शिंदे, या सर्वांना बरोबर कूच करण्याविषयीं हुकूम करा. त्या प्रमाणेंच रणदिवे, जगताप, मोहिते. क्षीरसागर, धुमाळ, कितूरकरदेसाई, नरगुंदवाले, शहाण्णव कुळींचे सर्व मराठे सर-दार जमले पाहिजेत.

**बळवंतराव**—आतां काय ! भाऊसाहेब निघायचे असें कळ-ल्याबरोबर मग या सरदारमंडळींच्या आनंदाला काय पारावार आहे ? परवा उद्गीर येथें फत्ते झाल्याची वीरश्री अंगांत अजून मुसमुसती आहे, तेव्हां पुनः आतां गिलच्यांशीं सामना करण्याला आमचे मराठे बहादर कंबरा बांधून तलवारा परजून बाहेर पडतील.

**भाऊसा०**—या खेपेला महाराष्ट्र भूमींतील रणशूर पठ्ठ्यां-च्या अंगांतील शौर्यसागराच्या प्रचंड लाटा उसळून भयंकर

तुफान झालें पाहिजे. नेकजात मराठागडी दत्ताजी शिंदे, पेशव्यांच्या दौलतीचा खांब, त्याचा मस्तक कुतुबशहानें लाथेनें तुडविला हें ऐकतांच त्यांनां संताप सहन न होऊन त्यांनीं त्वेषानें आपलीं मनगटें कडकडून चावलीं पाहिजेत. "एक भवानी, कीं, एक दुराणी, और कुच जानते नहि" अशी त्यांची वृत्ति बनून गेली पाहिजे. एका भडाक्यासरसा दुराणी नेस्तनाबूद करण्याकरितां दक्षिण प्रांतांतून किती रणशार्दूल भयंकर गर्जना करीत, डरकण्या फोडीत निघताहेत, तें पाहूं या, चहूंकेर धूम माजली पाहिजे. गिलच्या सफाईजंग बुडला पाहिजे. समरांगणांत आलेला मृत्यु म्हणजे प्यारा दोस्त, अशी सर्वांची चालचाल खातरी झाली पाहिजे. देशाचा अभिमान, देशाची इभ्रत नाहींशी झाली आहे, ती पुनः मिळविण्याची ईर्षा धरून दुष्मनावर चाल केली पाहिजे. त्यांचे बाहु फुरफुरून कमरेस लटकाविलेल्या तलवारी 'आ' करून गिलच्यांचें रक्त प्राशन करण्याकरितां दवा धरून बसल्या पाहिजेत. याप्रमाणें तजवीज तुह्मीं केली पाहिजे. ( **भाऊसाहेब** जातो. )

**बळवंतराव**—स्वारी एकदां आवेशांत आली की शुद्ध नारसिंह अवतार. मग पुढें ब करण्याची कोणाची माय व्याली आहे? सगळें मर्जीबरहुकूम घडून आलें पाहिजे. नाहींतर तबियत जात चालली. त्या शिंद्याहोळकराची काय पण चडेजाव माजली आहे! आपसा अपसांत किताल, नेटेचखंडे करून सरकारचे गाईचें नुकसान करण्याचा त्यांचा इरादा आहे आतां मात्र ऐन खुषीची गोष्ट होते कीं, खासा स्वारी मोहिमेवर जात आहे. मलाही बरोबर येण्याचा हुकूम झाला आहे. आतां त्या बुढ्या मल्हारराव होळकराच्या धनगरी मसलती कितीशा तडीस जाणार आहेत हें पाहतों. जनकोजी शिंदे तर अजून अल्लड बच्चा आहे. भाऊसाहेब कसे झाले तरी आमचे मेहुणे आहेत, तेव्हां भरदरबारांत आमच्या भाषणानें जो काहीं रुबाब पडेल, त्याच्या निम्मेनें सुद्धां खुद्द शिंदेहोळकरांचें तेज पडणार नाहीं. हिंदुस्थानांत फार पुंडावा माजविला आहे नाहीं? हा मेहेंदळे आतां तुमची गुर्मी जिरवून टाकतों आहे समजलांत? मेला दत्ताजी शिंदा तर मेला.

त्यांत भाऊसाहेबांना इतके अजुर्दा होण्याचें काय कारण एक पाय गोमीचा तुटला तर गोम लंगडी का होते? पण हें सध्यां बोलावें कोणीं? जराशी सबूर केली पाहिजे, ह्मणजे माझे सर्व बेत हलके हलके तडीस जाणार आहेत. ( जातो. )

---

## प्रवेश ४ था.

### स्थळ—आंबेपडतूर येथील पेशव्यांची छावणी.

( **गोपिकाबाई माधवरावाला** घेऊन बसली आहे. )

**गोपिका०**—कायरे माधव, काय म्हणायचें झालेंरे.

**माधव०**—आई, नाना ह्मणाले, तूं बच्चा आहेस, तूं हिंदुस्थानांत जाऊं नको. आई मी आतां लहान काग आहे? मी माझी ढाल तरवार घेऊन काकाबरोबर हिंदुस्थानांत जाईन, आणि त्या दुराणीच्या पोटांत ही तलवार अश्शी भोंसकीन, आणि तो मरून जाईल. आई, दादा बराग जातो ह्मणतो? मी नाहीं गेल्याशिवाय रहाणार.

**गोपिका०**—मोठा आलास शूर तरवार भोंसकायला तो मेला दुराणी अगदीं झोंपच घेत असेल वाटतें? तुह्मी दोघे गेल्यावर मग मला कसें बरें करमेल? शिवाय तिकडची आज्ञा तुला मिळाली नाहीं ह्मणतोस. मग मी तरी काय करूं? आणि विश्वासरावाला तरी कोण जाऊं देतें?

**माधव०**—आई तूं सांगतेस नानाला माझ्याबद्दल. तुझें कसें तेव्हांच ऐकतात. मवाशीं तूं जेव्हां ह्मणालीस, की तुह्मी स्वतः नाहीं जायचं हिंदुस्थानांत—खबरदार-तेव्हां नाना कसे गप्प बसले आणि तुला राग आला का ग, तुला राग आला का ग, असें ह्मणून तुझी समजूत करूं लागले. मी पहात होतों पण.

**गोपिका०**—चिप्. चुरचुर किती बोलावं. मला नाहीं असलें फाजील मूल आवडत. लोकांनीं ऐकलें तर काय म्हणतील बाई! भाऊजींच्या जवळ असें बोलत जाऊं नकोस अं.

**माधव०**—तूं जर मला काकाबरोबर धाडिलेंस, तर नाहीं बो-

लायचा, नाहीं तर सांगेन कीं नानाच्या आणखी आईच्या मनांत तुह्मींच स्वारीला जावें असें आहे.

**गोपिका०**--देऊं कां एक तोंडांत! असें खोटें बोलतोस कां!

**माधव०**-लहान मुलें नाहीं खोटें बोलत. आई कांग तूं मला विनाकारण मारतेस ? मी नानाला सांगेन. बग आपला विचार. आई तो बग दादा आला. ( **विश्वासराव** प्रवेश करितो. )

**विश्वासराव**--आई, नानासाहेबांनीं भाऊसाहेबांची पुष्कळ दिलजमाई केली, पण त्यांनीं कांहीं आपला हेका सोडिला नाहीं. आतां लवकरच तुझा निरोप घेण्याकरितां ते इकडे येतील. या वेळीं तूं तरी चार गोष्टी सांगून पहा, असें नानासाहेबांनीं सांगितलें आहे. भाऊसाहेब अगदीं संतापून गेले आहेत. दादासाहेबांला तर त्यांनीं नुसतें 'येतों,' ह्मणून सुद्धां विचारलें नाहीं. लोक आपल्याला काय म्हणतील ! नानासाहेबांच्या नांवाला कमीपणा येईल. याचा तूं कांहीं विचार कर. लोक म्हणतील आपल्या चुलतभावाला--तो बिचारा एकटा आहे--त्याला तेव्हढा दिला लढाईच्या तोंडावर पाठवून. आपला भाऊ, आपला मुलगा यांना कांही पाठविलें नाहीं. असें जर महादजीपंत पुरंदरे, खाजगीवाले, वगैरे मंडळी म्हणूं लागली, तर तुम्ही काय उत्तर कराल ? कालच्या उद्गीरच्या लढाईंत दादासाहेबांनीं आणि मी स्वतः भाऊसाहेबांना अगदी जोडीनें मदत केली. आम्हीं तिघांनीं मोंगलाला जेर केला. तेव्हां कसें तरी करून मला तरी निदान तूं हिंदुस्थानांत भाऊसाहेबांबरोबर जाऊं दे.

**गोपिका०**--येऊन जाऊन तुझा विचार आपलें घोडें पुढें ढकलायचें आहे. मेली आईला लाज नसते म्हणतात तें कांहीं खोटें नाहीं हो. लोकांशीं मला काय करायचें आहे. ज्याला जें वाटेल तें तो बकेल. तुला दरबारांत इथें राहून, सगळ्या कामकाजाची माहिती शिकली पाहिजे. तुला कांहीं जाण्याचें कारण नाहीं.

**माधव०**--आई, दादा जर गेला तर मी गणपतीशपथ कधीं कधीं गेल्याशिवाय राहणार नाहीं. ( रडूं लागतो. )

**विश्वासराव**--गप बैसरे. याचें आपलें तिसरेंच 'बीचमे मेरा

चांद भाई ' आई, दरबारांत राहून कामकाज शिकावयाचे दिवस अजून लांब आहेत. तूर्त आम्हीं स्वाऱ्या शिकाऱ्यावर जाऊन, छातीला छाती भिडवून, रणकल्लोळ कसा माजवावा, रातवेरात दुष्मानांवर घाले कसे घालावे, त्यांचे फौजेंत हेरांचें सोंग घेऊन, प्रवेश करून, ते गाफिल केव्हां असतात, याची टेहळणी कशी करावी, युद्धाला माऱ्याचें ठिकाण कसें असावें, ह्मणजे खातरीनें फत्ते होणार हें कसें शिकावें, फौजेची मांडणूक कशी असावी, वैरी चालून अंगावर आला असतां, भ्यालों असें दाखवून गनीमी काव्यानें हुलकावण्या देत त्याला कसा दमवून टाकावा, आणि तो अगदीं दमछाट झाला कीं, एकदम सर्वांनीं जुळून त्याजवर तटून पडून, त्याला सफई लुटून फस्त करून, पार गारत करून कसा टाकावा, वगैरे गोष्टींचें आतांपासून आम्हांला शिक्षण मिळालेंच पाहिजे. एवढ्यासाठीं जायचें समजलीस.

**माधव०**—दादा, मला शिकवशील कारे या सगळ्या गोष्टी ? मी आपला घोडा अगदीं तुझ्या शेजारीं उभा करीन.

**गोपिका०**—विश्वासराव, तूं जर गेलास तर माझें येथें कसें होईल ? आज चार दिवस त्या मेल्या मोंगलांवर उदगीराला गेला होतास, दोघे भाऊजी तुझ्याबरोबर होते, तरी मला अहोरात्र डोळ्याला डोळा नाहीं बरं ! कसें होईल काय होईल, कां या मुलाला कोणी धरून नेईल, कां कोणी वर्मी जखम करील, वैरी चिंतीत नाहीं, तें मेलें हें मन चिंतितें. नाहीं नाहीं ते विचार माझ्या मनांत येऊन मला अन्नसुद्धां गोड लागत नव्हतें. आतां तर दूरचा पल्ला. कोणीकडे मेली ती दिल्ली, आणि कोणीकडे आमचें पुणें ? तुला काय करायचें आहे, तूं अजून मूल आहेस. भाऊजींना जाऊंदे हवें असेल तर. मी आपल्याकडून पुष्कळ आग्रह करितें. इतक्यावर त्यांची मर्जी. स्वाऱ्या, शिकाऱ्या, लढाया करायलाच जन्म घेतला आहेस. असें न करशील, तर मामाजींच्या नांवाला बट्टा लागणार आहे. त्यांच्या पायाच्याच पुण्यप्रतापानें सगळें कांहीं सुयंत्र होणार आहे. ( रडत रडत ) पण तूं अगदीं लहान आहेस, ह्मणून तूं जाऊं लाग-

लास म्हणजे काळीज कसें तिळतिळ तुटतेंरे ! ! पोटचा गोळा मेल्या त्या यवनांच्या स्वाधीन करायचा ! एवढ्या खेपेला तूं जावेंस असें मला वाटत नाहीं. मेलीं नाहीं नाहीं तसलीं दुष्ट स्वप्नें पडतात. बाळा विश्वासा नकोरे असा हट्ट घेऊं.

**विश्वासराव**--आई, तुला दुःख देऊन, तुझ्या डोळ्यांतून अश्रु आणावेत, तुझी आज्ञा मोडावी, हा कांहीं माझा पुत्रधर्म नव्हे. तुझ्या डोळ्याला पाणी आलेलें पाहिलें म्हणजे माझा कंठ भरून येतो. माझ्या कृतीनें किंवा भाषणानें जर तुला दुःख होत असेल, तर मी पुत्र कसचा ? कसाव आहे. जो मुलगा आईबापांना दुःख देतो, तो जगाचें हंसें करून घेतो, नरकाचें साधन करतो. पण आई, आम्हीं वेदाध्ययन सोडून दिलेलें आहे. क्षात्रधर्म पत्करिला आहे. मग त्या धर्माप्रमाणें नकोका वागायला ? सांग बरें ? लवांकुश किती लहान होते ? अभिमन्यु किती लहान होता ? मग ते गेले कीं नाहीं लढाईला ? यश अपयश येणें हें शंकराचे स्वाधीन आहे. पण प्रयत्न करणें हें आमच्यासारख्या शूरांचें काम आहे.

( भाऊसाहेब प्रवेश करितो. )

**माधव०**--आई, हा पहा काका आला. काका, तूं मला म्हणाला नाहींस कीं जर विश्वासराव आला, तर तुला बरोबर नेईन म्हणून ? खोटें बोलूं नको.

**भाऊसा०**—( माधवास कडेवर घेऊन त्याचा मुका घेऊन ) या गुलामाची कालपासून धांदल उडून गेली आहे. सगळ्यांच्यावर याची तयारी. हें बग बाळ, तुला कीं नाहीं पुढल्या स्वारीत न्यावयाचें बरोबर. तोंपर्यंत तूं नुसतें घोड्यावर बसायला शिकावेंस.

**माधव०**—आम्हीं नाहीं जा तुमची गडी. आह्मी आतां येणार. मी तुलाच जाऊं देणार नाहीं.

**गोपिका०**--भाऊजी, हें तुम्हीं काय मांडलें आहे ? खासा स्वारी जाऊन काय करायचें बरें ? पदरीं सरदार थोडे कां आहेत !. मेला माणसाचा जीव उगीच काळजींत घालायचा. ती दुराणी मेली

अर्बुद जात, दत्ताजी शिंद्याचें डोकें कापलें, महिपतराव दिवाणाचें डोकें कापलें, हें असें ऐकून माझ्या काळजांत कसें अगदीं चर्र होतें. तुम्हीं कांहीं जाऊं नये, असें इकडून सुद्धां निक्षून सांगणें झालें आहे. मला जर विचारायला आपण आलां असाल, तर या तोंडानें मी म्हणून " तुम्ही जा " असें कधीं म्हणायची नाहीं. मेलें कुणाचेंच कां ऐकूं नये ? अगदीं आपलाच हेका धरून बसावें ? आणि इतक्यावर आम्हांला असें दुःखांत लोटून जायचें असेल तर खुशाल जा. आमच्या पाठीवर तरी कोण आहे ? चांगले रामलक्ष्मणाप्रमाणें इथें आनंदानें राज्य करीत आहांत.

**भाऊसा०**—या वेळेला तुम्ही माझ्या मोहिमेला खो घालूं नका. या खेपेला मी साफ कोणाचें ऐकणार नाहीं. वकतपर तुमची माझे हातून बेअदबी होईल, त्याची मला माफी करा. लढाईवर जाण्याचा अशा प्रकारचा मौका क्वचित् येतो. अशा लढायांत जर तलवार गाजविली, तर आपली कीर्ति अजरामर राहून या पेशव्यांच्या नांवाचा डंका सगळ्या दुनियेंत गाजेल. प्रसंग मोठा आणीबाणीचा आहे. माझा विचार तर गिलच्या नुसता हिंदुस्थानांतूनच पिटाळून लावण्याचा नाहीं, तर दौड करून, काबूलकंदहार लुटून, फन्ना उडवावा, आणि शिवाजीमहाराजांचा भगवा झेंडा इस्तंबूल शहरच्या तटावर फडकायला लावावा असें आहे. आणि हा भाऊ असें केल्याशिवाय माघार घेणार नाहीं. नानासाहेबांच्या आणि आपल्या पुण्यप्रतापानें सर्व गोष्टी घडून येतील. शिवाय आपले मनांतून आम्हीं एकदां येथून जावें असें आहेच. आम्हाला कां तुमचीं खलबतें समजत नाहींत असें कां तुम्ही समजतां ? ही तरी मला एका प्रकारची सूचना आहे असें मी समजतों.

**गोपिकाबाई**—कोणीं मेल्यानें तुमचे कान फुंकले आहेत मला कांहीं समजत नाहीं. तुम्ही गेलांत, म्हणजे आम्हांला त्रिभुवनाचें राज्य कां मिळणार आहे ? काय बोलतां काय ? तुमचें तुम्हांलाच शोभेनें हें बोलणें. आमच्या मनांत असा दुजाभाव मुळींच

नाहीं. असें असतें तर आजपावेतों आमची कृति तुह्मांला तशी दिसून आली असती. कालपासून इकडे जिवाला सारखी हुरहुर लागली आहे. तुम्हीं आपले संतापलेले. आम्हीं बायकांनीं काय मेला उपदेश करावा ?

**भाऊसा०**—आजपावेतों कांहीं कमी उपदेश झाला का ? बाप मेल्यावर सहा महिने सातान्यास पडून होतों. त्या वेळीं नुसतें कोणीं, 'तूं कोण आहेस ?' ह्मणून विचारिलें सुद्धां नाहीं. छत्रपति शाहूमहाराजांनीं जेव्हां परभारें कान उघडले, तेव्हां इथें घेऊन आलांत, आणि लावलेंत दरबारांत खरडे घासायला, तों अखेर आम्ही कोल्हापुरास जाईपावेतों. बरें हेंही असो. आतां तुमच्या तोंडानेंच निकाल होऊंद्या. परवां नानासाहेब मला ह्मणतात, तूं आणि दादासाहेब दोघेही पण मोहिमेवर जाऊं नका. या खेपेला मीच जातों. या भाषणाचा अर्थ काय सांगा बरें तुम्ही ? ते स्वतः गेल्यावर मग आम्हीं काय करायचें ? हें भाषण मर्मभेदक नव्हे काय ? तुम्ही हयात, तर आमच्यासारखे शेंकडों कारभारी तुम्हांला मिळतील. तुम्ही स्वतः जातां कां ? आणि असें टोंचून आम्हांला बोलतां कां ?

**गोपिकाबाई**—भाऊजी, उगच उखाळ्यापाखाळ्या काढून भांडण्यांत काय अर्थ आहे बरें ? सातान्याहून तुम्हांला आणिलें त्या वेळीं मला कांहींतरी समजत होतें कां ?

**भाऊसा०**--अहो वहिनीसाहेब, समजत नव्हतें तेव्हां इतक्या होतां; आतां तर समजूं लागलें आहे. राज्यकारभारांत तुमच्या सल्लामसलती घ्याव्या लागतात, कोणाला इनामाच्या सनदा करून द्यावयाच्या असल्या तर तुम्हांला विचारावें लागतें, साधारण देणगी कोणाला दिली तरी तुम्हांला विचारावें लागतें, आतांचें काम तर गिलच्यावर तलवार धरून चढाई करून जायचें आहे, यांत तुमची मसलत नको कां घ्यायला ?

**गोपिकाबाई**--काय हवें तें म्हणा, तुम्ही बोलल्याचा मला. मुळींच राग नाहीं. जसा माझा विश्वास तसेच तुम्ही मला. आज

नाहीं उद्यां तुमचा राग शांत होईल. पण या खेपेला काहीं तुम्ही जाऊं नका. शिंदेहोळकरांना हिकडून फौजेची कुमक करावी म्हणजे झालें. तुम्हाला लहानाचें मोठें केलें, जीव कीं प्राण केलें, त्याचें जर कांहीं उतराई व्हावयाचें असेल, तर मला एवढी जोड द्या—कीं तुम्हीं जाऊं नये.

**भाऊसा०**—लहानाचा मोठा केलेंत, याच्याबद्दल मी तुमचा फार फार आभारी आहे. बाकी बायकांनीं माझ्या मतें आपलीं संसाराचीं कामें पहावीत. पतीची सेवा करावी. नाहींतर चुलपोतेरें करून भांडीं घासावीत. यापलीकडे त्यांची अक्कल नाहीं. लढाईच्या घडामोडी, स्वाऱ्या शिकाऱ्या, देशाच्या आणि राज्याच्या उलाढाली, किल्ल्याला शह देणें, आणि बंडावे मोडणें, या गोष्टींत त्यांना मन घालण्याचा कांहीं संबंध नाहीं. बरें आहे आम्ही येतों आतां.

**गोपिकाबाई**—भाऊजी, असें एका घावास दोन तुकडे करून आम्हाला मोकलून जाऊं नका. तुम्हाला कुळस्वामीची शपथ आहे. तुमच्या पुढें पदर पसरतें बरें.. आमच्याविषयीं असें निष्ठुर होऊं नका. तुमच्यापुढें ही मी आपली अंगावरची शालजोडी टाकतें. हिला ओलांडून गेलांत म्हणजे मला ओलांडून गेलांत. यापलीकडे माझ्यानें तुमच्याशीं जास्त बोलवत नाहीं.

**भाऊसा०**—तुम्हाला मीं एकदां सांगितलें कीं, बायकांनीं आपली अक्कल चुलीपुढें चालवावी. असल्या गोष्टींत तुमची सल्ला मी नांव ऐकणार नाहीं. मी जाणार. ( शालजोडी बाजूला फेंकतो. ) अंगावरच्या शालजोडीचें सोंग मला कशाला पाहिजे? अशानें या भाऊचा निश्चय ढळणार नाहीं समजलांत? काय म्हणे विश्वास आणखी तुम्हीं, दोघे मला सारखेच.

**गोपिकाबाई**—( एकीकडे ) झालें. मीं आपली शिकस्त केली. जसें इकडून सांगणें झालें होतें तश्शी वागलें. भाऊजींचें अंतःकरण फार कठोर! आतां विश्वासरावाला बरोबर न्या असें म्हणणें भाग-आलें. नाहींतर जन काय म्हणेल? ( उघड ) बाळा विश्वासा, तु-

त्यांत आणि यांच्यांत मी काय बरें प्रतरणा करतें! कर तूं आपली जाण्याची तयारी. पार्वती जाते आहे त्यांच्याबरोबर, तेव्हां मुलीला पाठवायलाही कांहीं हरकत नाहीं. भाऊजी, माझा सगळा राग सोडा. संतापानें घरांतून बाहेर पडूं नये. काम होत नाहीं. हा मी आपला विश्वास तुमच्या स्वाधीन करतें. याचा हात धरा. ( त्याचा हात भाऊसाहेबांच्या हातीं देते व रडत रडत म्हणते ) हा पोटचा गोळा, काळजाचा तुकडा तोडून बरोबर दिला आहे बरें! याच्या जिवाला जिवापलीकडे जपा आणि या दोघे जय मिळवून. आई अंबाबाई यांना चिरायु कर. माझीं दोन्हीं मुलें मला पुनः डोळेभर दृष्टीस पडूं दें.

**भाऊसा०**—आतां कशी बरें आनंदानें परवानगी दिलीत. या विश्वासरावाबद्दल एक तिळभरसुद्धां काळजी करूं नका. याच्या एका केसाला धक्का लागला, तर पृथ्वी कंपायमान करीन, मग या दुराणीचा काय पाड! या विश्वासरावाला सर्व भारतीय जनांचा राजा बनवितों आणि त्याचे आज्ञेशिवाय या हिंदुस्थानांत पान हालूं नये, असा बंदोबस्त ठेवण्याची जिम्मेदारी मी आपल्या शिरावर घेतों. यवनांनीं गांजलेला हा माझा देश, आणि हे माझे लोक, यांना मुक्त करून त्या यवनांना या भरतभूमींतुन विश्वासरावाच्या सहाय्यानें पार निटाळून लावतों. तुम्ही खुशाल आनंदानें रहा. बरें आहे. येतों आतां आह्मी. ( उभयतां **गोपिकाबाई**च्या पायांवर डोकीं ठेवितात, व डोळ्यांस पाणी आणून ) वहिनी, जसा विश्वास तसाच मी, तुमचें लेंकरूं आहे. आजपावेतों नानासाहेबाला, दादासाहेबाला, आणि तुह्माला, मनाला लागेल असें कांहीं बोललों असेन, तें मनांत ठेवूं नका. माझे अन्याय पोटांत घाला. यापेक्षां जास्त कांहीं नाहीं. बाळा माधवा, तुला कीं नाहीं पुढल्या मोहिमेला खास खास बरोबर न्यावयाचें समजलास. ( त्याचा मुका घेतो. **माधव** त्याचे मागें रडत लागतो. **गोपिकाबाई** रडते. सगळे रडत जातात. )

[ दुसरा अंक समाप्त. ]

# अंक तिसरा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—ब्र्हाणपूर येथील भाऊसाहेबांची छावणी.

( समशेर बहादर आणि इब्राहिमखान गाडदी दोघे दोन बाजूंनीं प्रवेश करितात. )

इब्राहिमखान—सलाम आलेकम्.

समशेर०—आलेकम् सलाम्. मिजास तो मुबारिक ?

इब्राहिम०—आपके एनायत्से सब् अच्छा हय्.

समसेर०—क्यंव् इब्राहिमखानसाहेब, आपके पास रिसाला कितना हय्, और गाडदीलोक कितने हय्, तोफ कितनी हय्, और फाराशीस् लोगोंने जिनकूं जंगमे तरबेज् किया हय् एयसे लोग् कितने हय् ? हमारे पीछेसे आप् लौट् आये, इस्वास्ते हम् मुकाबला लेते हय्. आप् खपा न होना. च्यूंके साहेबी बुलंद जनाब भाऊसाहेब फौरन् तशरीफ् लानेवाले हय्. और लश्करकी दर्याफ्ता करनेवाले हय्.

इब्राहिम०—समशेर बहादरसाहेब, मय् आप् लोगोंका एहसान् मंदहूं. आपके दर्याफ्तीसे मय् हरगीज गरम् न होगा. ये आप् यकीन् सम्जो. नवाजिश् फर्माइये. मेरेपास घोडा अरब्बी पांच हजार हय्. और फारशीस् लोगोंके तालीमे तरबेज् हुवे हय् अय्से लोग् दस हजार गाडदी हय्, तोफ मेरी खानगी उंचालीस् चवालीस् हय्. आप्के खुर्द फिल्हाल् घोडा कितना हय् जनाब ? आप् तो शेहजादे हय्.

समशेर०—मेरे पास एक्सा हमारे दख्खनका घोडा पांच हज्जार हय्. देखो साहेब दख्खनका घोडा बहुत तेज रहता. आप्ने देखा हय्, क्या उसकी खुप्सूर्ती हय् ? और कय्सा तेज हय् ! उदगीरके लडाईका आप्का जिक्र कयुसा क्या हय् ? और

मुजफरखानका क्या किस्सा हय् ये मय् कुच् जानता नहि.

**इब्राहिम**०—मुजूफरखानका ये किस्सा हय् के, फराशीस बूसीसाहेबके पास वो तालीम् पडा हुवा था. और सरदार महिपतराव बाबासाहेब पुरंदरे के तयूनातके वास्ते नोकरीके बाजे दिनू ठेयराथा. फिर व्हासे सुलताने म्हैसूर तरफ् गया. फिर व्हासे नबाबे सावनूरके पास गया. और फिर पेशवेसरकारके तरफ् आया. हम् उसूके भतीजे वगैरा कुई हयू. जब् हम् निजामअ- ल्लीसाहेबसे मौसूफ् जनाब भाऊसाहेबके तरफ आये, तो मुज- फरखानकूं बडा गुस्सा आया. और इसूका नतीजा ये हुवा के उनूने आपूना दामात होनेवाला, हैदूरअल्ली करके कोई शकूसकूं भाऊसाहेबके उपर कस्यार चलानेका हुकूम किया. अलबत्ता उसूका इरादा भाऊसाबका खुन करनेका था. फिर इनूतेजाम् क्या हुवा, ये जिकूर आपूकू रोषन् हयू. जब् मय् पहिले राजा भाऊसाहेबकू मेरे तयनातूकी तसूलीम बजाई, तो मुजे दस हज्जार रुपयां सरकारने इनूआम् दिया. उस् वक्त मेरे पास दस हज्जार रिसाला था. उदगीरमे निजामअल्लीसे जो सामना हुवा उसूमे मेरा बडा नुकूसान हुवा हयू.

**समशेर**०—जहन्नमूमे जाने दो वो मुजूफरखान् और वो हैदूर- खान् के उन्ने अयूसे कदूरदान् भाऊसाहेबके उपर पेशकबूज् चलाया. मय् समजतां हूं के आपूके तयूनातपरसे दस हज्जार रुपयां निसार हयू. भाऊसाहेबने बहोती मामूल और फाबील काम किया के, आपके सरीके नेकूजात् लोगोंकू बडी जायूदाद दिया. औरभी आपूको वे दौलतमंद बनायूगें. ये आप् खूप यकीन् समजो. भाऊसाहेब वास्ते अरामीयतूके ह्यां आज् ठैयूरनेवाले हयू. मय् समजताहू जायूबजायू मुकामूबमुकाम् आपूसरीके नेक- बख्न, लोगोंपर बखुषी मेहेरनजर करके आपूके दरजेके बमुजब आपूको सरबराई करनेका हुक्म फर्मावेंगें. मगर ये कोन् आता है ? मयू समजताहूं सरकार मौसुफ हयू ( **भाऊसाहेब** व **बळवंत- राव** मेहेंदळे प्रवेश करितात. त्यांस उभयतां सलाम करतात. )

**भाऊसा०**—क्यंव इब्राहिमखान गाडदी, इस्वक्त तुमारा इरादा क्या हय!

**इब्राहिम**—जनाब, आपसरीके कदरदान हो तो मुजे क्या कम हय. लेकिन गनीमोका हमेषा ये मामूल हय के वक्तपर वो जंगमेसे भागजाते, वक्तपर मुकामबमुकाम हमला करते उस् तौरपर हम गाडदी लोग कयसे रहेंगे? इस्बातोंका हुजूरने गौर करना जरूर हय. हम गाडदी लोग जिस जायपर ठेरते हय व्हांसे एक उंगलभी पीछे न होते. इसवास्ते हम गाडदी कहला जाते हय.

**भाऊसा०**—आप कहते हय सो शायत गनीम लोगोंका महावेरा होगा. मगर हमे वो कबूल नहि. ये आप यकीने कामील समजना. अयहले इसलाम लोगोंके जंगमे ये सदाशिवराव जिस ठिकानेपर ठेयरा जायगा, उस जायपर मानिंद गाडदीयोके ठेयरा जायगा. मेरे उप्पर आप एतबार रखना के मानीन्द गनीमोके जायबजाय मय भागनेवाला नहि. तमाम गाडदी लोगोंमे ये हजहार करो के, जहां तुम सब गाडदी लोग जंगमे ठेयरेंगे व्हां ये सदाशिवराव मुस्तकीम ठेयरेंगा, मगर तुमकूं छोडकर जानेवाला नहि. आपकू चाहे तो बेलभंडारा उठाके देता हूं.

**इब्राहिम०**—मेरेपास दस हजार गाडदी हय. उन लोगोंका आखिर इन्तूकाल होवेतक वो येक तसू जाय कधी पीछे न होगे. शिवाय घोडा पांच हजार हय्. चवालीस तोफ हय्. हम जातके मुसलमीन होके हमारे आप कदरदान हय्. सरकार निजामअली हमसे बेयमान् ठेयरे. आपका अनाज फिल्हाल् खाताहूं. आप्के वास्ते ये जान् मौजूद हय् कटूगयी तो बेहतर बेइमान् कधी न हूंगा. साजकरोटी उठाके देता हूं.

**भाऊसा०**—तुमारे कलामपर मय् निहायत् खुष् हय्. आपके मुकाबिल थोडे मुसलमीन् होते. बलवंतराव तुमारे बेडेके सरबाराईके वास्ते और दस हज्जार रुपय्या तुमे सुपुर्द करेगा. आप ले-

नेका इन्कार मत् करो और मुकामूबमुकाम् मुसाफिरखानेमे तुम् लोग् आरामीयत्से देहलीके तरफ चलो. आप्कू जानेकी इजाजत् हय. ( गाडदी सलाम करून जातो. ) समशेर बहादूरसाहेब, इब्राहीमखानसे क्या गुफ्तुगू चल् रही ती? कहनेके मोवाफिक् हो, तो हमे उसमे शरीक करो. मगर तुमारी कुच जवानीके तौरपर आपक मापुकके बाते हो तो हमे पुछनेका एख्त्यार नहि. और जरूर नहि.

**समशेर०**—भाऊसाहेब, मेरा ये किस्सा चलाथा के मुजफद्खान जिसने आपके तनूपर हैदरखानके हात्से खंजीर चलाया, ये बातका वो बयान् करता था. और आप्ने पहिले मुलाखत् कू रुपय्या दस हज्जार इनूआम् दिये, और सब् गाडदी लोगोंकी दिलेरी समजगये, और आप्के मिजासकी बहोत् तारीफ करताथा. आपकूमापूकके बातोका जिक्र मय् हरगीज् न करताहूं.

**भाऊसा०**—नबाब गाजीउद्दीन, जो फिल्हाल् देहलीमे वजिरात करनेका इरादा रखूता हय् उसकू एक मर्जीना करके बहोत खुप् सूरत बहेन् हय्. उसकी शादी आप्से करनेका उसका इरादा हय. और दादासाबने ये बात् उसकू कबूल किया हय्. बलके बादजंगके ये सब बातोंका हम् जात्से खियाल् करेंगे. आप् बेफिक्र रहो.

**समशेर०**—शादीके बारेमे हम् कुच् जानूते नहि. आप् हमारे बडे चचेरे भाई हो. नानासाहेब, दादासाहेब, और आप्के रायूपर मय रजामंद हूं, खयर आप् आदाब् बजाताहूं. ( सलाम करून जातो. )

**बळवंत०**—भाऊसाहेब, शिंदेहोळकरांनां आपण निवाल्याचीं आंबेपडतुराहून पत्रें पाठविलीं होतीं. त्यांना मीं इतकेंच लिहिलें होतें कीं, आम्हीं मजल दरमजल यावें किंवा दम खात यावें. यावर त्यांच्याकडून उत्तर आलें आहे कीं, " भाऊसाहेब फार थोर खाविंद आहेत. त्यांनीं पुण्यांत राहूनच फौजेचा पुरवठा करावयाचा होता.

भाऊसाहेब कर्ते असून ते निघून कसे आले ? नानासाहेबांच्या हातून मदत होणार नाहीं. तेव्हां बहुतेक कारभार आटोपलाच ह्मणावयाचा. ज्यानें येण्याचा मनसबा दिला, तो थोर मनुष्य आहे. नजीबखान रोहिला, सुजाउद्दवला, अहमदखान लंगडा पठाण, कुतबशहा, आणि दुराणी, हे कांहीं सामान्य नाहींत. मोहरा इरेस पाडावा असा अर्थ नाहीं. करितां साहेबीं माळवे प्रांतीं राहून छावणी करावी. पुढें फौज मात्र सडी रवाना करावी. आह्मी आपल्या नुसत्या दमावर काम फत्ते करतों."

**भाऊसा०**—मला वाटतें शिंदेहोळकरांची ही सल्ला उत्तम आहे. त्यांना म्हणावें आम्हीं माळवे प्रांतीं मुक्काम करतों. तुम्हाला फौजेचा पुरवठा वाटेल तितका करतों. रसद पाठवितों. तुम्हीं त्या गिलच्याला तंबी पोंहचवून, काबूल, कंदहार, बेचिराख करून इस्तंबूल शहरावर बावटा चढवून तलवार गाजवून या. फक्त नजीबखान आणि कुतु-बशहा दोघांना जिवंत धरून आणा, म्हणजे माझी प्रतिज्ञा तडीस गेली. लढाई आटोपल्यावर आपण सर्व दिल्लीस जाऊं आणि आपला कार्यभाग करून टाकूं.

**बळवंत०**—भाऊसाहेब, शिंदेहोळकरांचीं डावपेंचाचीं पत्रें आप-ल्यास समजलीं नाहींत. आपण दिल्लीला आल्याचें त्यांना सुख नाहीं. याचें कारण असें कीं, आपल्या नुसत्या नांवाचा त्या गिलच्यांना इतका दरारा आहे कीं, आपण आलेले त्यांनां नुसतें कळलें कीं पुरे अहमदशहा अबदल्ली आपल्यास तोंड दाखवीत नाहीं. याप्रमाणें जर न झालें, तर म्हणाल तें ऐकेन. आपण आल्यावर मग या शिंदेहो-ळकरांची काय बडीजाव माजणार ? यांना कोण पुसणार ? म्हणून आपण माळवे प्रांतीं रहावें, दुसरें काय आहे ? पण असें कांहीं करा-वयाचें नाहीं. अस्से आपण दिल्लीला जाणार. आपल्या नुसत्या जा-ण्यानें गिलच्या पळून जाईल. हे शिंदेहोळकर दिवसेंदिवस अगदीं प्रति पेशवेसरकार बनत चालले आहेत. तुम्हीं म्हणे यंव करा आणि त्यंव करा. आम्हांला वाटेल तसें आम्ही करूं. इकडे कांहीं कोणी त्यांनां दडपायला नाहीं कांहीं नाहीं.

**भाऊसा०**—मला हसूं येतें तुमच्या बोलण्याचें. तुम्हीं कां मल्हारराव होळकरांनां दडपणार वाटतें? मारतील तुमच्या एक तोंडांत, आणि माझ्याही. खुद्द नानासाहेबांची पुढें बोलण्याची जुरत नाहीं, तो इतरांची काय कथा? रावबाजींच्या कुटुंबाची सुद्धां ते मुरवत ठेवीत नाहींत, समजलात? साठ लाख रुपये पेशव्याचें कर्ज त्यांनीं पुण्यांत आपल्या हिमतीवर विष्णु महादेव गद्रे सावकाराकडून एका घटकेंत देऊन टाकिलें. असें त्यांचें वजन आहे. ते वृद्धक आहेत. तुम्ही आम्ही कालचीं पोरें. त्यांच्यापुढें काय बोलणार? ते सांगतील तसें ऐकणें भाग आहे.

**बळवंत०**—आपण असें म्हटलेंत मग बोलणेंच खुंटलें. अहो धन्यानें तरी आपल्या हातून आपला मान राखून घेतला पाहिजे. मी ह्मणतों कीं चाकर पुष्कळ जुना आहे, आणि तो झाला शिरजोर, तर त्याला वेळेनुसार चार उपदेशाचे शब्द बोलले पाहिजेत, किंवा थोडीशी शिक्षासुद्धां केली पाहिजे. म्हणजे शिंदेहोळकरांविषयीं मी असें म्हणतों असें समजूं नका. आपली जगांत वागण्याची गोष्ट सांगतों. आपला हुकूम होईल तसें मी त्यांना पत्र पाठवितों.

**भाऊसा०**—त्यांनां फक्त इतकेंच पत्र लिहा, कीं आम्हीं ढोलपूरचे घाटानें उतरावें किंवा आहेरीच्या घाटानें उतरावें याचा खुलासा करावा. मग खुद्द मल्हारराव होळकरांची गांठ पडल्यावर त्यांची समजूत करूं. आणखी रागें भरले तरी ते वडील आहेत. आम्ही आतां आपल्या सर्व फौजचा क्षणभर देखावा पाहतों, तोंपावेतों तुम्ही श्रीमंतांनां आपण येथपावेतों आल्याची खुशालीचीं पत्रें लिहा.

( **बळवंतराव** जातो. )

**भाऊसा०**—हें एवढें अफाट सैन्य बरोबर आणिलें आहे, याशिवाय शिंदेहोळकरांच्या फौजा आह्मांला येऊन मिळावयाच्या आहेतच. शिवाय मजल दरमजल आला घोडेस्वार तयनातीस ठेवित चाललोंच आहें. आज तोफखाना जरबा सुमारें चारशें, याशिवाय जेजाला, आणखी सुतारनाला मिळून आवाज दोन हजार आहेत. हजारों जंबुरे आहेत. बारा हजार ऊंट नुसते बाणांच्या कैच्यांनीं

लादलेले आहेत. हा एवढा आवाढव्य सेनासमुद्र पाहिला ह्मणजे माझी चित्तवृत्ति तल्लीन होऊन जाते. रास्ते, पटवर्धन, ढमढेरे, तळे-कर, पंतप्रतिनिधि, सचीव, नागपूरकर, भोंसले, घोरपडे, निंबाळकर, घाडगे, मोहिते, माने, पाटणकर—काय एकेक बहादर डौलानें भरगच्ची झुला हत्तींवर घालून, अंबारीला अंबारी कसा तकटून चालला असतो. मला वाटतें नुसत्या अबदागिरीच पंचवीस हजार असतील. भोंसल्यांनीं वीस हजार अरब बरोबर आणला आहे. तीस हजार हबशी बरोबर आहे. चाळीस हजार पठाण आहेत. सांडणी स्वारांची डाक फिरवून सगळ्या फौजेची जर झडती घेतली, तर मला वाटतें तीन लाख लोक आहेत. नुसते चाळीस हजार सडक पल्लेदार तलवारी घेतलेले कर्नाटकेच भेटतील. काय एकेक वीरबहादर मिशीला पीळ देऊन, पीळदार बालेपेच मारून, भरजरी मंदिलाचे समले पाठीवर सोडून, अस्तन्या चढवून, अंगांत जिरेटोप बखत्यारे चढवून, पीळदार मानांस पिवळी माती फासून, खांडा, पट्टा, सुरे, तीरकमठे, गोफणगुंडे, तमंचा, बंदुका, कडाबीन चकमक, भाले, बिचवे, बर्ची, गुप्ती घेऊन जरीचीं लखलखीत निशाणें पुढें घालून ढालेशीं ढाल भिडवून जरीपटक्याचे हत्तीभोंवतीं झुलत चाललेले असतात. कर-बलवाले, एककांडे, बासडीवाले, आणि भलेभले सरदार आपापल्या मिसलीनें गोलचे गोल बांधून चाललेले असतात. मोठमोठे दलबादल डेरे बरोबर घेतले आहेत, शेंकडो नगारखानें, डंके, तुडुंब झडताहेत, घोड्यांच्या कठोर किंकाळ्या चालल्या आहेत. दशादिशा धुळीनें धुंद झाल्या आहेत. हजारों तुतान्या आणि शिंगें वाजताहेत. अहाहा ! ! काय ही आह्मां मराठे बहादरांची दौलत ! या एवढ्या रणशूर, रणगाजी, जवान पठ्यांकडून इस्तंबूल शहराचे तटावर छत्रपति-महाराजांचा भगवा झेंडा फडकायला लावीन, तरच नांवाचा सदाशिवराव. ( जातो. )

---

## प्रवेश २ रा.

### स्थळ—शहाडेरा येथील नजीबखानाचें घर.

(**मर्जीना** खिडकींतून दोरीच्या आधारानें उतरते. **शिद्दी मकांडा** यांस झोंप लागली आहे.)

**मर्जीना**—वाहवारे मेरी फुपु !! इस्का नाम काम. तनव्वींमेसे इसूबमुजब् मुजे छोडा, के जैसा लोटन् कबूतर अस्मानसे नीचे गिरता हय्. आप् गनीमोंके छावनींमे जानेका इरादा रखती हूं. मगर ये लिबास् पेन्के जाना मुम्कीन् नहि. मेरा भाई गाजीउद्दीन शिंदे जनकोजीके पास शायत गया होगा. उसकू मय् मिल जाऊं, नहि तो ये बंदिका जाना सुलतान् समशेरबहादरके तरफ् हुवा, तो भी ऐन् खुषीका बात होनेवाली हय्. दुसरा हासल् मतलब् ये हय् के, मय् नजीबखानके पीरो मुर्शद् कुतुबशहा, जिसके मदनसे नजीबखा-नका मत्लब् ये था के वजीर गाजीउद्दीनकू नेस्तनाबुत् करूं, और शिंदा दत्ताजी मेरे भाईका पर्वरदिगार उस्काभी जान् लिया हय्. ये दो बातोंका बद्ला लेना चाहीये. कुतुबशहा और सैयमतखान कतल्बाज पंधरे हजार अफ्गाण लोगोंके सात् कुंजपुरेमे हय्. ये खबर मय् अब गनीमोंकू पोहोचावूंगी. और शिंदा जनकोजीकूं लेके व्हां जाकर कुतबशहाकूं और सय्मतखानकू मय् बता देऊंगी. अद्मी खता और गुन्हेमे हमेश गिरफ्तार हय्, सिरफ् खुदाहुताला पाक हय्. ये शिद्दी मकांडा गुलाम निंद्मे मष्गूल् हय्. अभी नजीबखान आवेगा. अब् तेरी कंबक्ती हय्. नजीबखानका आज् मेरेउपर अम्-लाफयूला करनेका इरादा था. अब् देख कैसा बद्ला लेती हय् ये मर्जीना. मयूने नदीके पैलीवर जानेकेवास्ते सब् तय्यारी रखी हय्. धीवर लोगोंकू बडा इनाम् देनेका येक्रार किया हय् ओ मुजे नद्दीके पैलवर पोहोंचा देंगे. मयूने नजीबखानके पेन्नेकेवास्ते कपडे सात् लाया हय्. उस्की मय् अब् तरकीब् निकालतीहूं. (जाते. नजीब-खान प्रवेश करून मकांडा शिद्यास लाथा मारतो.)

**नजीब०**—अय् एहमक् काले गद्धे, गव्हार, गुंगा साला, तेरी

मय्या मर्जीना ह्यांसे भाग गयी. तेरेकू खबर नहि ? तूं निंदमे मषूगूल् हय्. अबे बतूसूरत बन्नर, तेरेकू ह्यां पेहरेपर बिठायाथा, तनव्वीकूं रस्सी लगाके तेरे सामनेसे ओ निकल् गयी. अब क्या करना ? ( त्याचे कान धरून त्याला उठाबशा करायला लावतो. नंतर त्याला हातीं धरून ज्या दोरीच्या सहाय्यानें मर्जीना खिडकींतून उतरून पसार झाली, ती दोरी त्याच्या हातीं देऊन त्यास खुणेनें सर्व गोष्टी दाखवितो. मकांडा नजीबखानाचे पायां पडतो; व मी तिला जिवंत धरून आणतो अशी शपथ घेतो. नजीबखान त्यास एक कट्यार देतो.)

मारे डरके पसीना हो गया हय्. अगरचे ओ जिंदा न मिली तो उसकी जान ये कट्यारसे काट डालू. इतना काम तूने किया, तो तेरेकूं गुलामके पेशामेसे छोड देऊंगा. और बडा इनाम देऊंगा. ( शिद्दी कट्यार घेऊन जातो. ) मर्जीना, तूं बडी मतवाली हय्. ह्यांसे भाग गयी, नहि तो तेरेकू अच्ची मय् नशेमे मषूगुल्करके मेरा दिल पसंतीका काम करता था. खयर् और कुई दफे मौका आवेगा. तेरा भाई गाजीउद्दीन शिंदे जनकोजीकू जा मिला हय्, पुनेसे गनीम आके मिले हय्. हाती, घोडा, सवार, प्यादे, लाखों जमीयत् सात् लायी हय. उनका इरादा पहिले कुंजपुरेपर हमूला करनेका होगा. क्या करूं ? मय् रंज सीजताहूं इस् वक्त मारे नद्दीके पानीसे हम् उस जायूपर जाय् न सके. अब् कुंजपुरा बचना मुमकीन् नहि. मेरा दोस्त सयमतखान कतलबाज और मेरे उसताद् जनाब कुनजशाकी जान बचानेके वास्ते क्या तरकीब निकालू ? मेरी जान घबरा जाती है. या अल्ला, इनकू गनीमोके हातसे बचाव. गनीम मानिंद् शयतानके भागते हय्. हमारे तो पंधरा हजार लोग, उनके लाखों हय क्या करना ? अल्लाने कैसा बूरा वक्त लाया के पंधरा हजारमेसे एकभी जान न बचाव् सके. खयूर अब दरबारमे जानेकू देर होता हय्. मय अब चला जाताहूं. मगर मर्जीना ये खुब् समज् के ये गुंगा मकांडा तु ह्यांसे भाग गयी, इसका बदला खासा लेयंगा तू यकीन् जान्.

( पुन्हां मकांडा परत येतो. यमुना नदी ओलांडून मर्जीना गेली

मी पाहिली असें सुचवितो; व स्वतः तिला ठार मारण्याकरितां जाण्याची परवानगी घेऊन जातो. ) मय् समजता हूं मर्जीना बेहिरास हय्. नद्दी कयसी तीर गयी ! बडी ताजुबकी बात हय् ! के ये नजीबखानसे वो फरागत हो चुकी, उसके वास्ते मयने किसम् किसम्का जवाहिरात और अकूसाम् अकूसामके चीजे लायाथा. मगर अब क्या खाली तक्‌लीफ-अब मय् ये फिकरमे गिरफ्‌तार हूं के, कुतबशहा, सयमतूखान, मेरा दामात्, और मेरा समदी, इन् चारो लोगोंका भी ये मर्जीनेके हातसे, या गनीमोंके हातसे खामखा इनते काल होनेवाला ठेयूरा. अगरचे मेरा दामात और समदी मेरे पीरो मुर्शद कुतबशा और कतलबाज ये कुंजपुरके जंगमे नेसतूनाबूद हुवे तो मयभी गनीमोंकूं कभी रहेमादिल् नहूंगा. उनका और गाजीउद्दीनका नामानिशान मिटा देउंगा. मर्जीना बपसूतुर मेरी जान् लेनेके वास्ते अल्लाने तुजे ये इसलाम लोगोंमे पयदा किया हय्. अब देखताहूं तेरा नतीजा.

( जातो )

---

## प्रवेश ३ रा.

### स्थळ-दिल्ली शहर-पेशव्यांची छावणी.

( शिंदे होळकर भाऊसाहेबांची वाट पहात दरबारांत बसले आहेत. एक दोन चाकर उभे आहेत. )

**मल्हार०**—कोण बेअकली लोक श्रीमंतांनीं बरोबर आणले आहेत ! मला कांहीं समजत नाहीं. श्रीमंतांचें पहिलें पत्र एकदम आलें कीं, आम्ही " मजल दरमजल यावें, किंवा थांबत थांबत यावें. " तेव्हां आम्ही उत्तर पाठविलें कीं, ' आधीं श्रीमंतांनीं येण्याचें कारण नव्हतें. ज्यानें सल्ला दिली ते थोर मनुष्य आहेत. बरें आतां आलांच, तर माळवे प्रांतीं छावणी करून रहा. आम्हांस फौजेचा पुरवठा करा. आम्ही येथें फत्ते करून येतो. ' याप्रमाणें उघड उघड मजकुराचें पत्र पाठविलें असून त्याचें उत्तर मुळींच नाहीं. एकदम पत्रांत हा मजकूर " आम्ही ढोलपूरच्या घाटानें उतरावें

किंवा आहेरीच्या घाटानें चमेलीपार व्हावें " आमच्या पत्राचें उत्तर हें काय? पुनः जों कान-उघाडणी करण्याचें पत्र लिहिणार, तों स्वारीनें येऊन दिल्लीच्या किल्ल्याला मोरचे लाविले. सर्व पोरकट लोकांचा बाजार श्रीमंतांचे भोंवतीं जुळला आहे. आमची साठी बुद्धि नाठी झाली. आजपावेतों आम्ही पेशव्यांचें अनहित केलें म्हणावयाचें? जेव्हां आतां कोण शहाणे समागमें आले आहेत ते हित करून दाखविणार आहेत.

**जनको०**—मला हें आश्चर्य वाटतें कीं, आम्ही यांनां एक लाख फौज, दक्षिणेंतून मदतीला पाठवून द्यावी, अशी विनंति केली असतां हे खासा स्वारी स्वतः आले. बरें, आमच्या मदतीस आल्यावर आम्ही सांगतों तें मुळींच न ऐकतां आपल्यास दिल चाहेल तसें करतात. हिंदुस्थानांतली माहिती आम्हांला जास्ती कीं बळवंतराव मेहेंदळ्यांना! दुसरें मला हसूं येतें, कीं या स्वारींनीं बायकांमुलें कच्चेबच्चे बरोबर आणावयाचें कांहीं कारण! हे लढाईला आले कीं जत्रेला! भाऊसाहेबांचें कुटुंब बरोबर, विश्वासरावांचें कुटुंब बरोबर बळवंतराव मेहेंदळ्याचें कुटुंब बरोबर, मुलें बरोबर, जनार्दनपंत फडणिसाचें कुटुंब बरोबर, धायगुड्यांचे कुटुंब बरोबर, आणखी लढाईचा सामना कोणाशीं बांधावयाचा, तर अहमदशहा अबदल्ली, नजीबखान रोहिला, सुजाउद्दवला म्हणजे हीं कां सर्व मुलें आहेत? काय त्यांचा समज आहे कोण जाणें?

**मल्हार०**-जाऊं द्या. त्यांच्या अन्नानें आपण वाढलों आहोंत. धनी भलतेंच करूं लागले, तर त्याला आपण काय करणार? त्यांच्या पायांची सेवा करावयाची एवढें आपल्याला समजतें आहे. यावर त्यांची मर्जी. असेल गादीची पुण्याई तर मिळेल फत्ते. आतां येथें आल्या बरोबर कोणच्या लेकानें श्रीमंतांनां दिल्ली पावेतों येण्याची सल्ला दिली, तें विचारून त्याची चांगली छानी उतरून टाकतो.

**चाकर०**—सरकार श्रीमंतांची स्वारी आली.

( शिंदे, होळकर आडवे जातात. भाऊसाहेब, विश्वासराव, बळवंतराव मेहेंदळे, समशेरबहाद्दुर इब्राहिमखान सर्व स्वस्थळीं बसतात. )

**मल्हार०**—भाऊसाहेब, आपल्याला पत्रावर पत्रें पाठविलीं, कीं, आपण ग्वालेरीस छावणी करून मुक्काम करावा; असें असतां आपण टाकोटाक दिल्लीला आलांत. चार भोंवताले आपल्याला जे मिळाले आहेत ते बेवकूब आहेत, एवढा मोहरा आणून इरेस घातला, केवढा मूर्खपणा हा? कोणी तुह्मांला असा मनसबा दिला? मला त्याचें एकदां नांव तर कळूं द्या, म्हणजे त्याचे कान उपटतो. आम्ही आजतागाईत नेकजादीनें नौकरी बजावली, तें सारें व्यर्थ. आमचे बाल सफेत झाले. आतां आम्ही बेअक्कल झालों ह्मणावयाचें. तुमच्या पेशव्यांचे दरबारांत बुड्ढ्या मनुष्याची हीच किंमत वाटतें मग जनकोजी सारख्या पोराची तर तुम्ही तेव्हांच फजिती उडवून द्याल. कां आतां बोलत कां नाहीं?

**भाऊसा**—सुभेदार साहेब, जनकोजी शिंदे, आपल्या नेकजातपणाविषयीं, आपल्या इभ्रतीविषयीं, आपल्या इमानदारीविषयीं, जो निमकहराम तोंडांतून एक ब्र काढील त्याची जबान या समशेरीनें छाटून टाकीन. श्रीमंतांचे गादीचा अभिमान, शिंदे होळकरांना आहे ह्मणून पेशव्यांचे नांवाचा दरारा अटकेपलीकडे जाऊन गिलच्यांनां झोंचला. ही सगळी कर्तबगारी, हा गाजीपणा, हा मर्दानीपणा शिंदे होळकर, आमचे केवळ प्राण, या पेशवाई दौलतीचे आधारस्तंभ, यांचा आहे. ते शिंदेहोळकर जर दुष्मनानें गांजले, तर या सदाशिवरावानें दक्षिणदिशेला कुलुपें ठोकून, स्वस्थ सुखशय्येवर घोरत कां पडावें? मग या पेशव्यांच्या नांवाचा डंका त्रिभुवनांत काय गाजेल पण? सुभेदारसाहेब वृद्ध झाले म्हणून काय झालें? पंचानन म्हातारा झाला म्हणून या कंदहाराकडून आलेल्या जंबुकांनां तो हार जाणार नाहीं या विषयीं माझीबालंबाल खातरी आहे. हे माझे जनकोजी शिंदे, ज्यांच्या घराण्यांतील बहुतेक वीरांचें रक्त या पेशव्यांच्या नांवलौकिकासाठीं खर्च झालेलें आहे. ज्या शिंद्याचा वंशवृक्ष यवनासारख्या परदेशीय मर्कटांनीं मोडमोडून टाकला, आणखी ज्यानें माझा शिंदे दत्ताजी बेहोष असतां, त्याला लाथ मारून पालथा घालून त्याची गर्दन छाटली, ज्यानें दत्ताजीशीं बेमान होऊन, हरामखोरी

करून, अयोध्येच्या नबाबाकडे पळून जाऊन दुराणीला शिरजोर करून हिंदुस्थानांत आणून सुभेदारसाहेबांचे दिवाणबहाद्दर महिपतराव पळसीकरांचें डोकें उडविलें; त्यांना देहान्त शिक्षा करून आपल्या या आर्यावर्ताची गेलेली इजत, मलीन झालेली अब्रू पुनः सफा करावी, म्हणून खासा स्वारी आली. आतां मजवर खप्पा मर्जी करूं नका. आपण वडील अहांत मी पोर आहे.

**जनको०**—हें वीरश्रीचें भाषण, शिंदेहोळकरांविषयीं तलवारीच्या तीव्र धारेसारखा तिखट अभिमान, स्वतांविषयीं धनी असतां एवढा लीनपणा, हें पाहून शिंद्यांच्या घराण्यांत दुःखाग्नीनें भडकलेला वणवा थंड झाला. सरकारच्या पायांचे आम्ही बारगीर, आमच्यावर वक्त गुजरला म्हणून खुद्द खासा स्वारी दौडत आली, हें पाहून आमच्या अंगीं वीरश्री पुनः बाणून गेली आहे. आतां आम्ही धन्याच्या जोरावर असले दहा गिलचे मारे सफईजंग उडवून देऊन या पेशवेबहादराचें नांव साऱ्या जगांत अमर करूं. आपल्या फौजेचीं, आवेशाचीं, निर्धाराचीं, आणि हिंमतीचीं बोलणीं ऐकून, शिंदेहोळकरांच्या फौजेची छबी खुलत चाललेली आहे. पहिल्या सपाट्यासरसा, त्यांनीं दिल्लीचा किल्ला सही करून बादशहाचा वाडा हां हां म्हणतां सर केला. दुराणीचा वजीर शहावलीखान याचा भाचा याकुबअल्लीखान कुरनीसात करून प्राणदान मागूं लागला, त्याला जिवंत सोडिला. दिल्लीशहरचे तटावर आज पेशव्यांचे नांवाचा बावटा फडकत राहिलेला आहे. आतां सर्व पादशाही दौलत पेशवे सरकारची आहे. पाहिजे त्याला पादशहा नेमा. मात्र वजिरात गाजीउद्दीन यास देण्याची मेहेरनजर व्हावी. एवढी पायापाशीं विनंति आहे.

**बळवं०**--( एकीकडे ) हें चाकरांवर याचें वजन आणि हा यांचा रुबाब. शिंदेहोळकर पाहिले, कीं पेशवे आपल्या नांग्या टाकतात. पहिल्या सपाट्यास होळकरांनीं भाषण करतांच त्यांस ' चुपराव ' म्हणून गप बसावयाला लावायचें तें गेलें कोणीकडे. कोठवर सांगावें ? जनकोजी शिंद्यानें आतां मोठीं नोकझोकाचीं भाषणें करून दिल्लीचा किल्ला सर केल्याविषयीं पोकळ बहादुरी बरीच दाखविली. प्रथम

किल्ल्याला शह मींच दिला होता. इतकेंच नाहीं, पण पन्नास निशाणें शर्त करून मींच किल्ल्यावर चढविलीं, पुढें मग वाड्यांतील पठाणांनीं आमच्या लोकांचीं कत्तल चालविली, त्यावेळीं हे शिंदेबहादर आले. आमचे मालकच जर त्यांचे पोवाडे गातात, तर आम्हालाही हांजी हांजी करून झील खेंचलीच पाहिजे.

**इब्राहिम**—देखीये समशेरबहादरसाहेब, क्या दोनो यारोंकी मिठी मिठी बाते चल रही हय. भाऊसाहेब और शिंदे जनकोजी, और सुभेदार मल्हारराव होळकरसारीखे मुआफिक् एहेलेआदल रमेमदिल, और जवामर्द, कोई सरकार मेरे नजरमे इस्तकबिलन् आया. मुजे निहायत् खुषी होती हय के, मय अय्से कदरदान, और खानदान लोगोंका खयरखवा नोकर हूं.

**समशेरबहादर**–हमारे चाचा जान जनाब बाजीरावसाहेबकूं आदमीयोंकी इमतेहान् इस कदरथी, की गोया एक उस्तादे शरीफ वो इस बारेमे थे. सुभेदार मल्हारराव होळकर, और जनकोजीके जद्द आमजत जनाब् रानोजी शिंदे इन् दोनोकूं दर्जेबदर्जे हमारे वालिदने बढाया. अब क्या जिकर होता हय् वो सुनीये साहेब.

**चाकर**–सरकार कुंमेरीचे सुरजमल जाट आले आहेत. ( पेशवे व सर्व सरदार खडी ताजीम देतात. )

**विश्वास**०–सुभेदारसाहेब, सुरजमल जाट हे मोठे शिंदे होळकरांचे दोस्त आहेत. शिवाय इमानाचे शाबूत आहेत; कारण आह्मीं त्यांना प्रथम आमची मुलाकत आग्र्यास घ्यावी ह्मणून संदेशा पाठविला होता. त्या वेळीं जाटाकडून जबाब आला कीं, आजपावेतों शिंदेहोळकर यांचेतर्फे आमच्याशीं सल्लामसलतीचीं भाषणें होत आलीं, करितां साहेबी त्यांच्याकडून तामिली करावी. नंतर मग, आपल्यास आह्मीं सांगितलें. बरें हें असो, पण सुभेदारसाहेब, मला वाटतें लढाई चालविण्याविषयीं उत्कृष्ट रीति कोणची या बाबतींत यांची आपण सल्ला घ्यावी. काय हो सुरजमलजी यासंबंधानें आपली सल्ला काय आहे?

**सुरज०**—सरकार भाऊसाहेब, रावसाहेब, आप सर्व भूमीके भूपती हो. मयं यःकश्चित् कुंभेरीका जमीनदार हूं. प्रंतु जीस अर्थसे मुझे आप आदरभावसे बिचारते हो, तों इस अर्थसे मुझकोभी भलीभाती स्पष्ट मनसे सल्ह देना उचित है. सिवाही इन्होने साथ परिवार ले आये है, और बडे बडे सरंजाम साथमें है, अवझड तोफखानाभी है, इस विषय युद्धमें बहुत बडी हानी होवेगी. हमारे रजपूत लोगोंसे दक्षीणके मनुष्य तीव्र होते है, ऐसा अनुभव होता है, प्रंतु दुर्रानी अपने मनुष्योंसे जल्द काम करनेवाले होते है. कारण कीं, उन्होसे सन्मुख होते समय, आप आपने सर्व परिवार सहित जड सामान अपने आधीन है, सो झांसी था ग्वालेरके किल्लेमे रखना, या सर्कारकी इच्छा प्रमान, मोरा, दीगका किल्ला, य भरतपूरका किल्ला, या कुंभेरका किल्ला, य बिकट स्थान है. वहा रखे तो मै अपनी साठ हजार फौज सर्कारकी तैनातमें रखता हूं. दक्षिणके आपके सर्व रिसालोंको रसद मै पुराताहुं. लोन पैसे सेर और चना पैसे सेर युद्ध ईसमाप्त होनेतक् आपके सर्व फौजोंको पुरानेकी जुमेदारी करताहूं. इस प्रकारकी तैयारी करके युद्ध किये तो शत्रुकी फुटाफुट हो जायगी.

**जनको०**—ग्वालेरचा किल्ला किंवा झांशीचा किल्ला सरकारानें पसंत केला, आणखी आपले कबीले व बुणगे तेथें नेऊन ठेवण्याचा हुकूम केला, तर हा जनकोजी शिंदे, फौजेस आपल्या मुलखांतून रसद पुरवील. याबद्दल सरकारची खातर तसलीम पाहिजे असल्यास सुभेदारसाहेबांकडून करवतों. लढाईला बायकामाणसें बरोबर असणें, हें कांहीं आपल्याला तरी निदान पसंत नाहीं. आमच्या थोरल्या छत्रपति महाराजांपासून तो आज तागायत असें कोणींच केले नाहीं. एक दुष्मन्, की एक समशेर. मारूं किंवा मरूं, पण दुष्मन्‌ला हार जाणार नाहीं हें आमचें ब्रीद. लढाईत बायका अगदीं शृंखला आहेत. याबद्दल सरकारांनीं विचार करावा.

**मल्हार०**—तोफखाना वगैरे पोक्त सरंजाम आपल्यासारख्या

राजकीय लोकांस योग्य आहे. तरी आम्हां मराठ्यांची लढाई म्हटली म्हणजे, रातबेरात साधून छाप्यावर छापे घालून लुटीत जावयाचें. बोलून चालून आमचें नांव 'गनीम.' आजपावेतों आम्हांस अशा तऱ्हेनें लढाईची संवय आहे. आणि मला वाटतें, हीच रीत पुढें ठेवावी. दिल्ली शहर ही कांहीं आमची वतनदारीची जागा नाहीं, म्हणून तेथील बादशाही आम्हांस न मिळाली, आणखी तसेंच परत जावें लागलें, तर त्यांत आम्हांला लाजण्याचें कारण नाहीं. राजा सुरजमल, यांचा उपदेश फार योग्य आहे. माझीही पण अशीच खातरी आहे कीं, गिलच्याला पोबाराच करावा लागेल. कारण त्यांनां या देशांत घर म्हणून नाहीं. शिवाय मी पन्नास हजार पेंढार त्याच्यामागें लावतों. पावसाळा होईपावेतों आपण असेंच बळ बांधून रहावें, म्हणजे दुराणी आपल्या देशास गेला म्हणून समजा. दिल्लीपावेतों मुलूख मराठ्यांनीं सर केलाच आहे.

**चाकर**—सरकार, कोणी पठाण दुराणीच्या छावणींतून आलेला आहे. ( पठाण प्रवेश करितो )

**पठाण**—कदम्बोसी करके, तीन दफे तस्लीम् बजाके, और सलतनद् पादशहा दखनकूं, और् उस्के माताहन तमाम सरदार लोग अमीरलोग, जय्सेके सुभेदार मल्हारराव होळकर और् जनाबेमंद, शिंदे जनकोजी, और सुलतान समशेर बहादर फरजंदे जनाब बाजीरावसाहेब, इन् सब् सरदार लोगोंकूं, फिद्वी का मारुजा हयके गरिब्नवाज्, ये बंदा शहर देहलीका बासिंदा होके, इसका नाम् खिजरखान पठान हय्. और ये पठान वजीर गाजीउद्दीन्का खानाजात् जमीन्दार हय्. वजीर गाजीउद्दीनखान, गनीम लोगोंसे कधी न हुवा बेमान्, जिसने कतल फर्माया देहली का बाहशहा बेगुमान् जब उस्ने देखाके दुराणीके आगे, वो उठाता अतरदान् या पानदान्. शिंदे दत्ताजीके तरफ जो गया फौरन्, चूंके कुतबखान और नजीबखान ये दोन हय् शैतान, इन्से बचावे गया, सिंदे दत्ताजीकी जो जान्, तो मुफलसीमे फस् गया, दानीशमन् होके इन्सान्. ये खिजरखान्

नेकखान् उसकूं धुंडनेके वास्ते पाया हय् ये मकान्. जिसकेउपर ये दिल् हय् बारबार कुरबान. नजीबखान् और कुतबखान् दोनों हय् मेरे दुष्मन्. उन्का बद्‌ला लेनेके वास्ते, मय हूं परीशान्. कुतुबशहा और सय्मतूखान् जो चमन्मे बेफिकर हय् कुंजपुरेमे रातदिन् खुषी हूं मय् एय्न् जब् मुजे मिले आप्के अय्से कदरदान्. तलवार चमकावूं मय् जैसीके बिजली हय् अस्मान्.

**जनको०**—नजीबखान और कुतुबखान् मानिन् शय्तान् के सुलतान गाजीउद्दीन की लेतेथे जान्. मगर ये हमारे सुरजमल जाठनें उडादिया उन्कूं गोया येक निशान्. किले कुंभेरीमे अप् ओ रहते हय् चाहे आपकूं लेजाव उन्की पय्छान्, फिल्हल् तुमकूं हम् सुपूर्द करते, सुलतान् समशेरखान, फरजंदे बादशाह दखन, दरजे तुमारे बढायेंगे दिन् ब दिन् और तन्खा तुम् पावेगे जानो यकीन्. (**मर्जीना समशेर बहादर** यांचे शेजारीं जाऊन बसते.)

**मर्जीना०** (एकीकडे) येह मेरा शादमानी दिल्दार, सुलतान् समशेर बहादर उसका नाम. अब् हो गया मेरा काम, करतीहूं खुदाकूं सो सो दफे सलाम जिसने एकी कलाम्मे मुजकू मिला दिया मेरा प्यारा परान्. सात् जाऊंगी इसके कबरस्तान्.

**जनको०**—सरकार, कुतुबशाहाची खबर या खिजरखान पठाणाच्या तोंडून ऐकतांच माझें चित्त अगदीं खवळून गेलें आहे. दत्ताजी शिंयाची मूर्ति खाड्‌कन डोळ्यांपुढें दत्त ह्मणून उभी राहिली आहे. अद्याप सूड घेऊन रक्ताचे पाट चालविले नाहींत, ह्मणून मला गालिप्रदान करीत आहेत. तलवारबहाद्दर शिंयांच्या वंशांत तूं असा सुस्त कारटा कसा पैदा झालास, म्हणून मजवर कराकरा दांत खात आहेत. कुतुबशहानें मला जोड्याची ठोकर मारून पालथा घालून माझी गर्दन छाटली, हें तूं विसरलास कां, ह्मणून खदिरांगारासारखे डोळे लाल करून मजकडे गुरकाऊन पहात आहेत. आज जरीपटक्याचें निशाण माझ्या सुपूर्द करा. तीन दिवसांचे आंत या जनकोजी शिंयानें कुंजपुऱ्याचे तटावर श्रीमंतांच्या नांवाचा बावटा जर न उभारला, तर भाऊसाहेबांनां पुनः तोंड दाखवणार नाहीं, हीच माझी प्रतिज्ञा. माझी

झाडून फौज या कुतुबशहाचे पायीं गारत झाली तरी हरकत नाहीं; पण खुनाला खून बदला घेईन तरच जयाप्पाहेब शिंद्याचा बच्चा.

**भाऊसा०**—जनकोजी शिंदे यांचें ह्मणणें अक्षरशः खरें आहे. वीरशिरोरत्नाला हेंच करणें योग्य आहे. हा खिजूरखान पठाण मोठा इभ्रतदार जमीनदार आहे. इमानदारही पण पहिल्या दर्जाचा दिसतो. गाजीउद्दीनला ठार मारण्याचा प्रयत्न त्या नीच नजीबखानानें आणि त्याच्या वस्तादनें केला तें याला सहन न होऊन ही स्वारी गरम होऊन गेली आहे. जनकोजी शिंदे तुम्हीं प्रतिज्ञा केल्याप्रमाणें या पठाणाला बरोबर नेऊन कुंजपुऱ्याला मोर्चेबंदी करा. कुंजपुरा किल्ल्यासुद्धां सही करून, आंत असलेल्या कुतबाची गर्दन माझ्या रूबरू छाटा, ह्मणजे त्या हरामजाद्याचें मस्तक लाथेच्या ठोंकरीनें उडवून टाकतों, आणि मी आपल्या प्रतिज्ञेंतून मोकळा होतों. तूर्त फौजेंत खर्चाची टंचाई झाली आहे, त्यास आमचा मनसबा असा आहे कीं, पाहशाही तक्तावर दिवाणखान्याला चांदीचें छत तळहातासारखें जाड आहे, तें फोडून फौजेस मुषाहिरा द्यावा. त्याचप्रमाणें गाजीउद्दीन यानें, अलमशा पातशहा दुराणीस सामील झाला ह्मणून, त्यास ठार केलाच आहे, करितां तूर्त लढाई खतम होईपावेतों अल्लीगौर पातशहा यांचा मुलगा जवानबखत यांस तक्तनशीन करावें. पुढें दुराणी यास शिकस्त केल्यावर अलाहिदा तजवीज केली जाईल. वजिरातीविषयीं जर म्हणाल, तर ती आम्हीं इतःपर मुसलमानांच्या घराण्यांत ठेवणार नाहीं. नारोशंकर यांस राजेबहादर अशी किताबत देऊन त्यांचेकडे दिल्लीची वजिरात कायम केली जात आहे. त्यांच्या दिमतीस पांच हजार फौज देऊन कुल अखत्यारीची अंमलबजावणी करण्याचा त्यांना अखत्यार दिला जात आहे. या सगळ्या हुकमाची बजावणी आमचे खाजगी दिवाण आणि मसलतदार बळवंतराव मेहेंदळे करतील.

**बळवंत०**—सरकारच्या हुकुमाप्रमाणें बंदोबस्त करतो. आतांचे आतां जाऊन बादशहाचे वाड्यांतील सर्व दौलत जप्त करितो. दरबारी दिवाणखान्याला अगणित खर्चानें बांधलेलें चांदीचें छत फोडून

टाकून त्याचे रुपये पाडवितो, आणि फौजेस तनखा देऊन टाकतो. ( जातां जातां एकीकडे ) अखेरीस साधली ह्मणावयाची. स्वारीला आजपावेतों पढवून पढवून बरीच आणली आहे ताब्यांत, पण केव्हां उलट खाईल याचा नेम नाहीं. आतां नारो शंकर वजीर आहे, आणि मी तरी बिरबलच आहे ह्मणावयाचा. या शिंदे होळकरांची चांदी उडवून देतो. रिकामी प्रतिष्ठा.

**सुरज०**—भाऊसाहेब, बादशाही गद्दीका स्थान मर्यादेका है. नादीरसाहा चढाई किया उस समय छतमें सोनेके कलस थे सो उसने लेगया. प्रंतु छतमें हात नहि लगाया. यह दुर्रानी बादशहा दो तीन बार चढाई किया सो उसने तोपो सहीत गला लेगया, प्रंतु छतमें हात लगाया नही. मर्यादा रखा. मै बादशाही उमराव अपके नीकट हाजर हु, सो हमारे सन्मुख ऐसी बात होना नही. बादशाही सम्मति बिगर परवाना लुटने पर, दक्षीणके बारगीयोंकी झुंड आने पर निश्चय तलवार चलेगी. तो हमको इस वार्तासे यश होनेवाला नही. स्वामीद्रोही हमारे भाग्यमे होता है. इस वास्ते विनय है कि आजके प्रसंगमें इतनाही जोड हमको देना कि छतको खंडन नहि करना. आपको कमी होवेतो मुझको आज्ञा करो, मै सर्कारको पांच लाख रुपये देताहुं. गाजी उद्दीनाकि वजिरात उसकु देना. इस विषय सिंध्याहोलकराकि और हमारी इमानप्रमान हुई है. मैं सदैव तुमारे आधीन हुं. साठ हजार फौज बराबर साथ लाया हूं. दिल्ली ऐसा शहर आप छोडकर जाना नही. कुंजपुरा यहासे पचास कोस है. चढाई करना होवेतो यहांसेही यत्न करना. प्रंतु दिल्लीस्थानको कदापि छोडना नही.

**भाऊसा०**—सुरजमल, आम्ही कांहीं दक्षिण सोडून तुमच्या बळावर इथें आलों नाहीं समजलांत. काय मला जरब घालतां कीं, बादशाही दौलत, हुकमबिगर दक्षिणेच्या बारग्यांची फौज लुटायला आली, तर बेलाशक तलवार चालेल ? आमच्या फौजेनें कांकणें कां भरलीं आहेत ? बादशहानें दौलत कोठून आणली ? आमचा देश, आमची दौलत. ज्यांची योग्यता अगदीं क्षुल्लक, अशा यवनांनीं

दिल्लीच्या तक्तावर बसून लौकिक मिळविला असून, आमच्यासारख्यांनीं दुष्मनावर चाल करून जाण्याच्या ऐवजीं फक्त आपलाच बचाव करीत भागुबाईसारखें बसावें ही आमच्यासारख्या वीरांना आणखी आमच्या जोडीदार मर्दबहादर शिंदेहोळकरांना मोठी शरमेची गोष्ट आहे. मला वाटतें, सुभेदारसाहेबांची मिजास दिवसेंदिवस थंड होत चालली आहे. त्यांच्या समजुतींत फरक पडत चाललेला आहे. " आपण रात बेरात छापे घालूं. " चार महिने बादल बरसाद आम्हीं गम खाणार नाहीं. काय ह्मणून असें नामर्दपणाचें काम? छातीला छाती भिडवून, दंड ठोकून, सामना देण्याकरितां हा सदाशिवराव आला आहे समजलांत. सुरजमल जाट हा गृहस्थ एवढासा जमिनदार, त्यानें आपल्या बरोबरीचे दरजेवाल्यांना पाहिजे असेल तर अक्कल शिकवावी. आह्मालां शहाणपण शिकवायला आलांत काय? तुम्हाला जर पटेल तर रहा, नाहीं तर आपले ठिकाणावर जा. गिलच्यांनां तंबी दिल्यावर तुह्मी आम्ही समजून घेऊं. सुभेदारसाहेब, जनकोजी शिंदे, इभ्राहिमखान गाडदी, समशेर बहादर, बळवंतराव मेहेंदळे, दमाजी गायकवाड या सर्वांनीं उद्यां आपआपल्या फौजा घेऊन कुंजपुऱ्याकडे ढाला फिरवाव्या. खासास्वारी बरोबर निघणार. शिंदे जनकोजीनें सड्या फौजेनें जाऊं नये. कारण दत्ताजी शिंद्याला लाथ मारल्याचा सूड आह्मालां फार भयंकर रीतीनें घ्यावयाचा आहे. तीन दिवसांत पंधरा हजार पठाणासुद्धां कुतुबशा शिकस्त झालाच पाहिजे.

---

## प्रवेश ४ था.

### स्थळ—शहाडेरा येथील दुराणीची छावणी.

( बादशहाचा दरबार. **अहमदशहा अबद्दली, वजीर-शहावलीखान, सुजाउद्दवला, नजीबखान, अहमदखान, काशीराज,** वगैरे मंडळी दरबारांत बसली आहेत. )

**पादशहा**—या मौला, या खुदा, या नब्बी, ये गय्यर महाजची

आयूले हुनुद लोगोंने कुंजपुरेमे, पंधरे हज्जार लोगोंकू कत्तल किया होगा. कुतुबशाकू और सय्मतखान कत्तल बाजूकू गिरफ्दार किया होगा. उनकी जान् जानेवाली यकीन् हय्. ये क्या गजब् हमारे उपर ? हम खामोष हय् मार नद्दीके पानीसे. लेकिन् ये दखनके बंदर मय तुम्कू ये सनावो सिफूत् करताहूं के, जब मुकाबला होगा, तो मय हाती, घोडा, जानूवर वगैरा सब् खतम करेगा. फिर आद्‌म औरता, बच्चे, जिन्दा कय्से रहेंगे ? खय्र नवाब सुजाउद्दवलासाहेब मुजे अब ये सुनवाव, के हमारे अफगानी लोगोंकी जमियत कितनी हय्. और आब् लोगोंसे हमे क्या मदत है. वजीर शहावलीखान, कोन् कोन् सरदार लोग आपके साथ हय्, उनका नाम निशान हमे पेष करो, उंठ कितने हय्, हाती कितने हय्. घोडा कितना हय्. हमारी खानगी तोफ कितनी हय्, फौज कितने दस्ते लायी हय् इसका बयान करो.

**वजीर**०—जनाबेचंद, बारासो सवारोंका एक् एक् दस्ता, आय्सा आपने पास पचीस दस्ता घोडा हय्. बडे बडे सरदार लोग, जय्से के मय शहावलीखान, जहानखान, शहापसन्तखान, दुंदेखान, नसीरखान, बरखोरदारखान, वजीर अल्लीखान, मुरादखान इरानी, वगैरा दरजे अव्वलके सरदार हय्. दरजे दूवम् और सियम के सरदार सेकडों हय्. सरकारके खानगी गुलाम कोलेरान सात हज्जार हय्.

**सुजाउ**०—गरिबन्नवाज, सरकारके सात दर एक् ऊंठपर एक् एक् जंबुरक्, और दो दो गोलंदाज हय्. अय्से ऊंठ दो हज्जार हय्. सिवाय सरकारकी खानगी तोफ चवालीस हय्. मेरी पचास हज्जार फौज हुजूरके सुपुर्द हय्. मेरी दोसो तोफ हय्. नजीबखानके पास घोडा दो हज्जार, पायदल बीस हज्जार, और तोफ बीस हय्. दुंदेखान और हाफीज रहिमतखान इनके पास घोडा चार हज्जार, और पायदळ पंधरे हज्जार हय्. कुलजमियत दीड लाख और तोफ तीनसो हय्. तमाम घोडा तुरकी जातका हय् ये सब् सिस्तवार रिसाला हय्. सिवाय इसके बेसिस्तवार डीड लाख हय्. उनका घोडा और हतियार आबके सरीका हय्. ये बेकय्द लोग, कतूल करनेमे और लूट

करनेमे बहोत तरबेज हय्. तमाम लोग बडे ताकतदार, तन्के तन्दुरस्त हय्.

( **सिद्दी मकांडा** रडत रडत धांवत धांवत वर हात करून प्रवेश करितो. फौजेचें वर्णन करतो, लढाईचें वर्णन करतो, **नजीबखानास, कुतुबशहा, सयमतखान कतलबाज, नजीबखाना**चा व्याही आणि **जांवई** वगैरे लोक मराठ्यांनीं धरून नेले व पंधरा हज्जार लोकांची कत्तल केल्याचें खुणांनीं कळवितो. **जनकोजीनें** निशाण चढविलें, **कुंजपुऱ्या**चा तट जमीनदोस्त केला, वगैरे गोष्टी खुणांनीं कळवितो. )

**नजीब०**—( एकीकडे ) लाहोलवल्लाकुवत इल्लाबिल्ला, हमारे पीरोमुर्शद, जनाब कुतुबशहा, और दिलदार दोस्त, जनाब सयमत्खान कत्लबाज, जिसने हजारो हिंदू और ब्रिामनकू कत्ल किया, उस्कू आखिर गनीमने गिरफ्दार किया. मेरा समदी, और मेरा दामात, बडे तवंगर हय्, उनकू खामखा ये बदमाष जनकोजी शिंदा नेस्तनाबूद करेंगा. चूं के उसकूं दत्ताजीका बदला लेनेका हय्. मेरे उस्ताद् कुतुबशहा, ये नजीबखान बहोत लाचार हय्, के मारे नद्दीके पानीसे पयलीवर जा न सकना. मगर इसका बदला मय् अच्छा लूंगा. ( उघड )

जनाबेमंद, ये गुंगा शिद्दी मकांडा मयने तालाष करनेके वास्ते कुंजपुरेकू भेजाथा. ये अब् कहता हय् के पंधरे हज्जार पठान गनीमने काटा, खूनका दरया बन् गया. और कुतबशहा, सयमत्खान, मेरा समदी, और दामात इन चारोंकू कयद्खानेमे रखे हय्.

( **मर्जीना** पुरुषाचा पोषाख करून **कुंजपुऱ्यावर समशेर बहादरा**बरोबर आली होती, तिनें या लोकांस दाखविलें व **नजीबखाना**च्या **व्याह्या**च्या व **जांवया**च्या बोटास पलिते लावून त्यांच्या जवळून पंधरा लाख रुपये मराठ्यांनीं घेतले असें **मकांडा** खुणांनीं सांगतो. )

**नजीब०**—सरकार, ये गुंगा ये सुनवाता हय् के, मेरा समदी, और दामातके हातमे तेलमे दबे हुवे पलिता रखके, सिलगाते हय्. आब्

मय् क्या करूं? इस्चमुजब मुजे गुस्सा आया हय् के, गनीमका लहूं पी जाऊं. और सरकारे अली, ये गुंगा कहता हय्, के वजीर गाजी-उद्दीन की मयेन बीबी मर्जीना, इस्ने हिंदूमर्दूका लिबाज पेनके सात समशेरबहाद्दुरके पठान लोगोपर तलवार चलाई. कुतुबशहा सयमतखान मेरा समदी और मेरा दामात, इनकू गनीमके मर्जीनाने सुपूर्द किया. चूं के मेरा दामात और समदी गनीमके पय्छानके नहि. आब् इसका बदूला मय् क्या लेऊं?

( **मकांडा** त्याला पुनः जाण्याची परवानगी मागतो. **मर्जीने**ला ठार मारल्याशिवाय फिरून तोंड दाखवावयाचा नाहीं अशी शपथ घेतो. **नजीबखान** त्याला जाण्याची परवानगी देतो. )

**सुजा**०—गरिबनवाज्, गनीमोके दरजे अवलके सरदार भाऊ-साहेब पेशवे बहादर, इनका मुजे औरंगाबादवाला भवानी-शंकर इस्केसात् ये संदेसा आया हय्. इसके उपर हुजूरने गौर करना.

**काशीराजपंत**—नबाबसाहेब आबसे हमसे, दुष्मनकी बात् होना लाजीम् नहि. चुनाचे आपके वालिद, जनाब् मनसूरअली सफतर-जंग साहेब, इनकू हरएक काम्मे हमने मदत किया हय्. हमारी मर्जी ये थी के, आप बदस्तुर हमे मिल् जावे और आब् दोनो मिल्के दुरानीकूं नेस्तनाबूद् करे. अगरचे आप हमे मिल् न सकते हो, तो आप दुरानीकी ताबेदारी छोडके लखनौकूं बिल्फेल् वापस चले जाव्. येभी हमे अय्न खुषीकी बात हय्. और आपका बालादस्त कुई बडा सरदार होगा, तो उस्कू हमारे तरफ् आबके बदूला भेज्दो.

**पादशहा**—पंधरे हज्जार पठाण लोगोकूं गनीमने कतल फर्माया ये सूनके मेरा सर् मानींद् अंगारके गरम् हुवा हय्. देहली शहर नेस्त नाबूद् किया. बादशहाके कबिले लूट् लिया. पादशहाके किलेपर गनीमने झेंडा निशान चढाया. पादशहाके दरबारके छतं फोड डाला. उस्का रुपय्या बनाके तमाम् फौजमे तनखे का बटवाडा किया. बडे बडे सरदार लोग, अमीर उमराव लोग, जय्से के शास्तेखा, आस्तेखा, झुलफिकरखा, हिम्मतखा, गनसूर अलीखा, इब्राहिमखा, जामतअलीखा, फरदुल्लाखा, फत्तेखा, रनमस्तखा, अहमदखा, खावंदखा, कासमखा,

आयूसे आयूसे बडे सरदार आजतख नेस्त नाबूद किया. मराठे लोग लडनेमे बडे काबिल और हुशियार हय्. इनके आगे खुदा खडा न रहसके. सबने बडी धूम मचायी हय्. सल्ला करनेके वास्ते कोई न आता. उनका बडा जोर आता हय्. अब नद्दीके पयलिवर जानेकी कोई तरकीब बताये, तो ऐन खुषीके बात होनेवाली हय्. नद्दीके पयलीवर जानेतक् मय अब कुच खानेवाला नहि. रोजे रखताहूं नमाज पढताहूं. सब फौज नेस्त नाबूद हुवी तो मुजाका नहि, मगर अबिके अबि फौरन ह्यांसे कुच् करना.

**अहमद०**—जनाबेमंद, पानिपत कर्नोलके नजदीक, नद्दीके पय- लीवर जानेका एक रास्ता मिला हय्, अयसे मेरे लोग, मुजे अबि कयूतेथे. ह्यांसे चिल्केल् कूच करनेका इरादा शर्त करना. हाती उपर हास्तनाले, और ऊंठके उपर बानोकी कैंची लगाके, पहिले पानी कि- तना हय्, इस्का अंदाज् देखना; बाद उसके तमाम रिसाला और फौज लेजाना. जिस् वक्त गनीम बेहोष् हय् ऐसे हालतमे रातके वख्त् उन्के उपर हम्ला करना. ये मेरी तरकीब् हय.

**नजीब०**—मेरी राय इस वक्त ये हय के जो जनाबेमंद गनीं- मोकूं मिले तक् रोजे रखते हय्, तो अब सब सरदार लोगोंकूं ये मुम- कीन् नहि, के आब् लोगोने आनाज् खाना. आब लोगोने येही एक- रार करना चाहिये, के नद्दीके पयलीवर जाने तक् किसीनेभी हुक्का पानी न करना, अयूसा किया तो खुदा हुताला आपकी फतेमंदी सामखा करे गा.

**सर्व सरदार**—हमे ये राय् कुबूल हय्. सरकारकी सला हमे कुबूल् हय्. ( सर्व सलाम करतात. पडदा पडतो. )

---

## प्रवेश ५ वा.

### स्थळ—कुंजपुऱ्याचें रणांगण.

( **जनकोजी शिंदे**—हातांत जरीपटका घेऊन उभा आहे, असा पडदा उघडतो. )

**जनको०**—अहाहा!!! काय रणधुमाळी माजली आहे!! सग-

व्यांनीं मिळून हल्ला करून कुंजपुऱ्याचे धुडके धुडके उडविले आहेत. हा समशेर बहादूर, ज्यानें एकट्यानें तीस घोडा अडवून धरिला आहे, केवळ आपल्या यशाचा चौघडा वाजवीत आहे, धन्य रावबाजीचा पुत्र, पोटीं हिरा जन्माला आला आहे!!! हा बळवंतराव मेहंदळे, हातांत पट्टे चढवून शत्रूंच्या रंवदळींत किल्लयाच्या तटावरून सिंहाप्रमाणें उडी घालून अशुद्धाचीं कारंजीं उडवीत आहे. हा इब्राहिमखान गारदी आणि हा गाजीउद्दीनचा इमानदार जमीनदार खिजूरखान पठाण तोंडांत रक्तानें भरलेल्या तलवारींचीं पानें धरून सरासर किल्लयाचा तट बेगुमान चढत आहेत. दमाजी गायकवाड आणि विंचूरकर यांचे हत्ती बेफाम झाले आहेत. उभयतांचे हत्ती किल्लयाचे दरवाज्यावर मोहरे मारीत आहेत. बिचाऱ्या उंटांचा चुराडा उडतो आहे. भाल्यांच्या टोंकांना अंगावरच्या शेल्यांचे फरारे लावून किल्लयावर निशाण चढविण्याची उभयतांची झटापट लागली आहे. छोटे सरकार विश्वासराव केवळ फुलाचा झेला, साक्षात् विष्णूचा अवतार यांच्या तलवारीनें शेंकडों पठाणांची मस्ती जिरवली, ते विंचुरकराला मदत करीत आहेत. आणि आमचे भीष्माचार्य सुभेदार मल्हाराव होळकर, यांच्या तिरंदाजीनें तर कमाल केली. कोणी पठाणानें किल्लयाचे तटावर डोकें काढिलें कीं, नेमानें अचूक उडवितात.

चारा घटका झाल्या नुसती लाही फुटती आहे. जंगी समशेर गाजविणारे माझे मराठे गडी तलवार फत्ते करीत चालले आहेत. आतां या कट्टे लढणेवाल्या पठाणांची गुर्मी जिरवून टाकतो. एका मुसंडीसरसा दुस्मनांचा रिसाला दुखंड करून हा मराठे बहाद्दरांचा जरीपटका किल्लयाच्या तटावर फत्तेगड बुरुजावर लावीन, तरच खरा रणशूर जयाप्पा शिंद्याचा बच्चा. कर्दीम शिपाई (निशाण घेऊन पळत जातो. रणांगणांत मल्हाराव होळकर, विश्वासराव, बळवंतराव मेहेंदळे, समशेरबहाद्दर, इब्राहिमखान गाडदी, खिजरखान पठाण वगैरे सर्व सरदार ज्यांचीं वस्त्रें रक्तानें भरलेलीं आहेत असें जोरानें प्रवेश करितात. ),

**जनकोजी**०—( जोरानें प्रवेश करून ) शाबास! यारहो शाबास!! प्रतिज्ञेप्रमाणें अखेरीस कुंजपुऱ्याच्या किल्लयाच्या तटावर

झेंडा फडकायला लावला. हे माझे महाराष्ट्र भूमींतील वीर, रणमैदानांत, प्रत्यक्ष इंद्राला हार जाणार नाहींत. तो या दुराणीचा काय पाड? तळहातांवर शिरें घेऊन जसे रणनवरे बनून गेले आहेत! या रणबहादुरांना कांहीं काळीज आहे काय? ज्यांनीं कडाबिनी, जंबुरे, शुतारनाले, बंदुका, जेजाला, आणि तोफा यांच्या अशा फयूरा झाडल्या, असे ताशेरे मारले, कीं दुस्मानांचीं शिरें आणि धडें चेंडूसारखीं अस्मानांत उडत होतीं. कुंजपुऱ्यासारख्या मुल्तकीम ठाण्याचा संगीन कोट पाषाणी, या मर्दांनी फोडून हां हां ह्मणतां जमीनदोस्त करून टाकला. आज आह्मां मराठ्यांचें चित्तांत " करुणा " या शब्दाचें नांव नाहीं. रक्तबंबाळ मुंड्यांचे डोंगरासारखे ढिगारे करून टाकले आहेत. रक्तमांसाचा चिखल झाला आहे. पंधरा हजार पठाणांच्या गर्दनी छाटून कुंजपुऱ्याची अफाट वस्ती लुटून फस्त केली. आमच्या मराठ्यांच्या लाखों फौजेचा आवेशाचा हरहर महादेव ऐकतांच कुतुबशहाची गाळण झाली. कुतुबशहाला कैद केला. काकाचा पुरा सूड उगवून घेतला. आज माझ्या आनंदाला पारावार नाहीं. ही बातमी ऐकतांच दुराणीच्या फौजेनें हैबत खाल्लीच ह्मणून समजा.

**मल्हार०**—शाबास जनकोजी शिंदे जयाप्पाच्या पोटीं येऊन नांव केलेंस! तुझी उमर काय! तुझा पराक्रम केवढा! धन्य धन्य आहेस!! प्रेतांच्या ढिगाऱ्यावर चढून या महा पराक्रमी अभिमन्यूसारख्या छोट्या मर्दानें आपला जरीपटका किल्ल्याच्या तटावर प्रतिज्ञेप्रमाणें फडकायला लावला. माझ्या सर्व आमदानींत असा पराक्रमी पुरूष मी नाहीं पाहिला. दमाजी गायकवाडांनीं तरी आज मोठाच पराक्रम केला. कुतुबशहा, सयमनखान कतलबाज, नजीबउद्दुवल्याचा व्याही आणि जावाई, इतके लोक या खिजरखान पठाणानें गायकवाडाच्या हातीं जीवंत धरून दिले आहेत. या पठाणाची, समशेरबहाद्दुराची, इब्राहिमखानाची, आणि आमचे छोटे सरकार रावसाहेब विश्वासराव यांच्या पराक्रमाची, आजची शर्थ आहे. हा पहा कुतुबशहा, दमाजी गायकवाडांनीं हत्तीवर बसवून पाठविला आहे वाटतें. ( एकीकडून कुतुबशहा बंदीवान व एकीकडून भाऊसाहेब प्रवेश करितात. )

**भाऊसा०**—( जोरानें प्रवेश करून ) कुठें आहे तो हरामजादा? लाथ मारून हत्तीचे खालीं ढकलून दे. बेशरम तुला हत्तीवर कोणीं चढविलें? नजीबखान रोहिला ह्मणजे मनुष्यांच्या नीचपणाचा मूर्तिमंत पुतळा, सुभेदार होळकराचा, आणि शिंदे दत्ताजींचा मी धर्मपुत्र ह्मणून पायां पडतो, आणि त्यांच्याच नरडीचा घोट घ्यायला पाहतो आं!! ज्याच्या घरीं अन्न खाल्लें त्या गाजीउद्दिनाला ठार मारण्याला धावला, एक कीं दोन याचीं काळीं कृत्यें! त्या नीच तर नजीबखानाचा हा वस्ताद. ( त्याला हातानें पुढें ओढून ) अब् ये दत्ताजी शिंदे तेरे सामने खडा हय् देख. अय् मगरूर तेरेकू एक कोट रुपये इनाम देनेका एक़रार राजाराम चोपदारने किया था, लेकीन् अय् बत्कार तूने दत्ताजीकू जूनेकी लाथ उसके पीटपर मारी, और खंजरसे गर्दन चाक़ किया. ( सयमतखान कतलबाजास पुढें ओढून ) ए कौन् सयमत्खान कतलबाज! तूने अंताजी माणकेश्वरके तीन हजार लोगोंकू कतल कमा किया. अब् तेरेकू कतल फर्माताहूं. कुतुबशहा अब् तेरे दिलमे क्या सोच् हय्? ( उभयता कैदी कुर्नीसात करतात)

**कुतुब०**—जनाबेमंद क़ुसूर माफ़् करना. मेरी जान बचाव. अहमदशा अबदली और सुजाउद्दवला और नजीबखानसे आबकू चाहे वैसा एक़रार कर देताहूं. मेरेकू कय्दखानेमे रखो. लेकिन् जिन्दा रखो. चाहेतो मय पचास लाख रुपय्या जूरमाना देताहूं. मुजे जिंदा छोडो. अगरचे मेरेसे जंग करनेकी खाय्श हो, तो चंद्गेजके आरसेमे पचास हजार जमियत् लेके आपके सामने खडा रहता हय्.

**भाऊसा०**—दत्ताजीकी गर्दन किसने काटा? कोनसे हातसे कट्यार चलाई; वो हात अव्वल कलम करेगा. और कोनसे पावसे उसकू जूतेकी ठोकर मारा, वो पाव दूवम कलम करेगा. फिर तेरी पेशवे बहादरके झेंडेके नीचे गर्दन उडा देंगा. दोनोकोभी ये सजा हय्. दत्ताजीका सर कलम करनेका क्या वजेथा?

**कुतुब०**—सरकारे अली, हम् जातके अहेले इसलाम् लोग्. हमारे कुराने शरीफमे ये कलमी किया हय के, अगरचे दुष्मन् अपने

दाममे आया तो हरगिज् उसकू जिंदा न छोडना. इस्‌लिये ए बंदेने ऐसा बूरा काम किया.

**भाऊसा०**—शिंदे दत्ताजी किस्‌का बालादस्त हय् ? इस् तोरपर तेरेकू कुच् खियाल् हुवा था ? या तू नीन्दमे था ? अब दत्ताजीका बद्‌ला लेना हमे जुरूर जुरूर हय्. कोन् हय् ? ले जाक दोनोकू, उडादो दोनोकी कत्तल.

**मल्हार०**—सरकार मला वाटते याला जीवदान देऊन याच्याकडून महत् कार्य संपादन करून घ्यावें. याला मारला म्हणजे दत्ताजी शिंदे आपल्याला परत येतात असें थोडेंच आहे.

**जनकोजी०**—सरकार माझाही अर्ज असाच आहे. याच्या मार्फतीनें आपण दुराणीशीं वाटेल तसा करार करून घेऊं. याला कैदेंत ठेवावा ह्मणजे नजीबखान आपल्या ताब्यांत राहिल्यासारखा आहे. जरी यानें दत्ताजीचें डोकें मारलें आहे, तरी त्याबद्दल यास इतकें शासन बस आहे.

**इब्राहिमखान०**—सरकारे आलि, आपका हासलमतलब हो चुका. कुतुबशाकू सरकारने जिंदा पकडकर लाया हय्. अब मेरी राय ये हय् के, उसकू कैदखानेमे रखना चाहे वयसा एक्‌रार इसके मदतसे दुरानीसे कर लेना. बहोत जुरमाना लेना. मुलूख लेना. और दख्खनकू चले जाना.

**समशेरबहादर०**—भाऊसाहेब, इभ्राहीमखानकी सला हमे कुबूल् हय्. सरकारने कुतुबशाकू आपका गुलाम बनाया हय्. ये बद्‌माष् अपने काबूमे हय्. ये नजीबखानका वुस्नाद हय्. वास्ते इस्‌के नजीबखान इसकू कैदखानेमेसे छोडनेके बारेमे बहोत् कोशिस करेगा. करोड रुपया आपकू नजर करेगा. जनाबेमंद, सुभेदारसाहेब, और जनकोजी शिंदे, इनके बातोंपर हुजूरने गौर करना. फिर सरकार सब बातोके मालीक् हय्. दुश्मनकी जान लिया तो उसमे बद्‌नाम होगा. मगर उस्‌कू जिंदा छोडा तो आपके रहेम दिलकी बडी तारीफ् होके आपका नाम ये आलम् दुनियेमे कायम होगा.

**भाऊसा०**—एक वेळ नजीबखानाला सुभेदार होळकरांनीं जी-

वंत सोडला त्याचेंच हें फळ भोगीत आहों. आतां हा जीवंत ठेवला कीं दुप्पट आग लावून देईल. हे लोक मुळींच इमानाचे शाबूत नसतात. उडादो गर्दन. ( उभयता कैद्यांस घेऊन जातात. ) तुमचा हा दिलदारपणा या वेळीं कांहींच उपयोगाचा नाहीं. जनकोजी शिंदे जितके शूर आहेत तितकेच राहिमदिल आहेत, परंतु माझी प्रतिज्ञाच आहे कीं, कुतुबशहाचें शीर लाथेसरसें उडवीन तरच अप्पासाहेबांचा पुत्र. श्री सूर्यनारायणानें मला यश दिलें. या वेळीं प्रत्यक्ष बापाची आज्ञा मानणार नाहीं; ढालेपाशीं नेऊन शिरच्छेद झाला पाहिजे. नजीबखानाचा व्याही आणि जांवई, यांचे हाताला पलिते लावून नजीबखानाची ठेव कांहीं असेल तर ती त्यांचेकडून घेऊन फौजेला खयरात करा. समशेरबहादर और इब्राहिमखान तुम ये खिजरखान पठाणकू आपके बेडेमे लेजाव. और आरामियनसे लेट जाव. इसकू एक जियाफत दो. और लाख रुपये किमतका जवाहिरात इसकू बक्षीस दो. विश्वासराव, तुह्मालाही आज फारच श्रम पडले आहेत. तुम्ही जा, मी आलोंच. शिंदे होळकर यांनी आम्हांस दुराणीची सलाबत घातली, आतां ते दुराणी काय झाले ?

**बळवंत०**—सुरंजचे मुक्कामीं मीं सरकारास विनंति केली होती कीं, शिंदे होळकर आह्मांला धुडकावून लावतात; पण दुराणी आम्ही कानांनीं मात्र ऐकूं. आमच्या कांहीं दृष्टीस पडणार नाहीं. श्रीमंतांच्या पायाचा पुण्यप्रताप तसाच आहे.

**मल्हार०**—तें कांहीं असो. पण मला वाटतें, सरकारानें महत्कार्य करून फत्तेमंदी केली आहे. आतां तावडतोब कूच करून दिल्लीला चलावें.

**बळवंत०**—सुभेदार, तुमच्या अंगांत दुराणीचें शहारे कां शिरलें ? अद्याप तुमचें भय कां जात नाहीं ?

**मल्हार०**—तुम्ही ब्राम्हणजात निर्बळ, कांहीं आकाश फोडून आला नाहींत. पंचाननाची गांठ पडली नाहीं तोंपर्यंत वल्गना. खयूर आम्हांला आतां डेऱ्यास जाण्याची आज्ञा व्हावी.

( **शिंदे, होळकर, इब्राहिमखान,** व **समशेरबहादर** मुजरा करून जातात. )

**बळवंत**०—भाऊसाहेब, बोलतों याची माफी असावी. मला असें वाटतें कीं, हे तुमचे सुभेदार मल्हारराव होळकर दुराणीला खास सामील आहेत. जेव्हां तेव्हां त्यांची कड घेऊन भांडतात. त्यांची ही धनगरी सल्ला तुम्ही ऐकत नाहीं म्हणून बरें. आतां म्हणाले त्या कुतबशहाला जीवंत सोडा. एक नजीबखान धर्मपुत्र केला, दुसरा माधवसिंग जयनगरकर, तिसरा विजेसिंग मारवाडी, आतां हा चवथा धर्मपुत्र. जेवढे यांचे धर्मपुत्र तेवढे गळेकापू. सुरजमल जाटाला त्या दिवशीं आपण झाडल्याबरोबर होळकराच्याच मसलतीनें पळून गेला, यांतकांहीं शंका नाहीं. नाहींतर आपण उभयतांनी बेत केलाच होता कीं, त्याचा गोट लुटून टाकायचा. त्याला मोठी पैशाची घमेंड होती. पांच-लाख रुपये छताबद्दल देण्यास कबूल झाला होता. त्याला जर लुटला असतां तर खरोखर एक कोटपर्यंत ऐवज सरकारजमा झाला असता.

**भाऊसा**०—त्याच्यावर पाहरा करावयास शिंदेहोळकरांनां हुकूम केला होता. त्याचें हें असें फल आलें. आतां मी होळकरांनां साफ सांगणार आहे कीं तुम्ही बोलावल्याशिवाय दरबारांत येत जाऊं नये. कारण तुमच्याशिवाय जाट पळाला नाहीं. मीं मनांत म्हटलें कुंज-पुऱ्याची मोहिम झाल्यावर जाट होता कीं नाहीं असें करून टाकूं. या वेळीं होळकराचा हा कसूर मनांत ठेवला पाहिजे. बळवंतराव, " जाट म्हणजे जमीनदार " त्याच्या हातून अशी हलकट वर्तणूक झाली नाहीं तर नवल ! अशा वेळीं तो गेला हेंच उत्तम झालें. नाहींतर आम्हीं त्याला एखादें जबाबदारीचें काम सांगावें आणि त्यानें पळून जावें. यापेक्षां तो आधींच पळून गेला हें फार उत्तम झालें. बरें तें असो. तुम्हीं सुजाउद्दवल्याकडे मीं सांगितल्याप्रमाणें पत्र पाठविलें होतें कां ? त्याचें उत्तर काय आलें ?

**बळवंत**०—मी पत्र पाठविलें होतें कीं, आपल्या घराण्यामध्यें व आह्मांमध्यें वैमनस्य असण्याचें कांहीं कारण नाहीं. हें नर काय, पण आपले वडील सफ्तरजंग यांस आम्ही फार मदत केली आहे. असें असतां नबाबसाहेबाला शत्रूला मिळण्याचें कारण काय ? आपण खुद्द

हेंच कीं, आपल्याला व्यर्थ तसदी देणें आह्मांस फार गैर वाटलें. परंतु तूर्त प्रसंगीं आपण येऊन आह्मांस मिळल्यास फार उत्तम आहे. असें जर होत नसेल तर आपण दुराणीचा पक्ष तरी निदान सोडून देणें, आणि आपल्या तर्फेचा कोणी वजनदार मोठ्या योग्यतेचा माणूस आमच्या लष्करांत राहण्याकरितां पाठवून देणें. याप्रमाणें मी पत्र लिहिलें होतें. त्याचें उत्तर असें आलें कीं, आपणामध्यें व आह्मामध्यें आजपावेतों जी दोस्ती चालत आलेली आहे, ती मी कबूल करितों; पण या वेळीं मी आपल्यास येऊन मिळावें हें रास्त नाहीं. मला तसें करितां येणार नाहीं. तथापि जेव्हां जेव्हां संधि सांपडेल तेव्हां तेव्हां आपल्यास हिकडील बातमी कळवून योग्य मसलत देण्यास व माझी दोस्ती राखण्यास मी कमी करणार नाहीं. सध्यांच्या प्रसंगीं लढाईविषयीं माझी अशी सल्ला आहे कीं, आपण उडत उडत छापे घालण्याची तऱ्हा सोडून दुसरे कोणत्याही रीतीनें लढण्याचे खटपटींत पडूं नये. जर आपली सल्ला करण्याची मर्जी असेल, तर जमवून आणण्याची तजवीज मी करतों.

**भाऊसा०**—त्यानें सुचविलेल्या लढण्याच्या युक्तीबद्दल तूर्त त्यास एवढेंच पत्र पाठवा.

**चाकर**— सरकार, दुराणीकडून वकील तहाचें बोलणें लावण्याकरितां आला आहे. ( काशीराज पंडित प्रवेश करितो. )

**काशिराज**—सरकार, माझें नांव काशीराज. सरकाराला पादशहानें फार फार सलाम करून मौल्यवान् वस्त्रें, एक तुर्की जातीचा घोडा, शिरपेंच, मोत्यांचा तुरा, जडावाची कंठी, शुभ्रवर्ण ऐरावतीतुल्य हत्ती, मुलतानी तरकम कमाना दोन, असे नजर पाठविले आहेत. आणि तोंडीं अशी विनंती केली आहे, कीं तुम्हीं जोरावर होऊन मारवाड, लाहोर, बंगाला, काश्मीर, चितोड, द्वारका, गुजराथ, त्याचप्रमाणें काशीपलीकडे, दमाऊकमाऊचे पहाडापावेतों अम्मल सुरू करून पादशहाचा खजीना बंद केला. रूमशाम येथें एकछत्री राज्य करावें, चतुःसमुद्रपावेतों पृथ्वी पादाक्रांत करावी, ही तुमची इच्छा. रूमशामचे बडे पादशहा १०९ सनदिन पैगंबर सुलतान महंमदसाहेब, यांनां समजन त्यांनीं आह्मांस दिल्लीपतीची हुरमत राखण्याकरितां बिदा केलें

आहे. चितोडकर राणा संग्रामसिंह, उदेपूरकर सवाई जयसिंग, जयपूर-कर, याशिवाय बावन्न उमराव या सर्वांनीं पादशाहीच्या बाबी बंद करून तुह्मांस मिळून तुह्मी सर्व हिंदुमय करूं पाहतां. विजापूर. बेदर, दौलताबाद, अहमदनगर, कर्नाटक काबीज करून हैद्राबादेस मोर्चे लावले. दक्षिणचे सहा सुभे किलिजखान्, मुताल्लक फत्तेजंग बहादूर, टोलेजंगबहादूर, शिद्दी, अमीर वगैरे पादशहाजादे दिवसेंदिवस खालीं आणलेत. बऱ्हाणपूर, औरंगाबाद, श्रीरंगपट्टण, वगैरे महाकुब्चल जागा काव्यादाव्यानें सर करून, दिल्लीस हिंदुपदपादशाही करण्याचा इरादा केला आहे. तुमच्या दहशतीनें अलमगीर पादशहाचे वेळचे नामी नामी उमराव शास्तेखां, आस्तेखां, झुलफिकरखां, हिम्मतअलीखां, खानखां, इब्राहीमखां, जामत अलीखां, खावदखां, कासमखां, नेस्त नाबूद झाले. पेशजी पादशहा कृपावंत होऊन, दक्षिणेंतील सरदेशमुखी तुह्मांस करार करून दिली आहे, ती अनुभवून सुखरूप असावें. नर्मदेच्या पलीकडे तुह्मीं आपली हद्द संरक्षण करून असावें. तुमच्या फौजेस घांसदाण्याबद्दल दोनकोट रुपये, व एक कोट रुपये स्वारीखर्चं येणेंप्रमाणें रोख देऊन पादशाही सनद नवीन करून देतों. नोकरीच्या पेशानें दिल्लीच्या पादशहाजवळ एक साल राहून सरफराई करून घेणें. जिद्द वाढल्यास कामास येणार नाहीं. त्यांत तुह्मीं माकूल आहा.

**भाऊसा०**—आमची उलटी पादशहास अशी विनंती करा कीं, दिल्लीचे पादशाहीचा बंदोबस्त आमचा आह्मी करूं. तुह्मी परक्या पादशहाचे मानाहत असतां नजीबखान, सुजाउद्दवला यांच्या बोलावण्यावर हावभरी होऊन आपली हद्द टाकून अलिकडे आलांत. मागें तुह्मीं दोन तीन वेळां येऊन पादशाही बुडविली. हल्लीं मलकाजमानीचें अनुमोदनानें व्यर्थ दंगा करीत आहांत, ही गोष्ट इनसान् नाहीं. तुह्मी आम्हास अडथळा कोण करणार ? आमचे चित्तास येईल त्याप्रमाणें करावयास श्रीमंत नानासाहेब समर्थ आहेत. चार लक्ष फौजेचे पादशहा श्रीमंत छत्रपतिमहाराज सातारकर यांचा पराक्रम विक्रमादित्यासारखा, त्यांचा वरदहस्त आमच्या मस्तकीं आहे. लढाई करावी हाच आमचा निश्चय आहे. आह्मी तुमची तमा करीत नाहीं. आह्मी

तुम्हास दबून राहणार नाहीं. भाईचारा राखण्याची इच्छा असल्यास तावडतोब अटक उतरून परत जा. नऊ कोट रुपये रोख देऊन फुलांच्या माळांनीं हात बांधून नानासाहेब पेशव्यांना शरण यावें. नाहीं तर कृष्णातीरच्या घोड्यांना सिंधुनदाचें पाणी तर पाजलेंच आहे, पण पुढें चौदाशें कोस जाऊन इस्तंबूलची खबर घेईन, असा निरोप कळवून आमचा सलाम बोला. अमचाही नजराणा पादशहास चालीप्रमाणें घेऊन चला. ( सर्व जातात. )

[ तिसरा अंक समाप्त. ]

---

# अंक चवथा.

## प्रवेश १ ला.

---

**स्थळ**—कुंजपुरा येथील समशेरबहादराचा गोट.

( **मर्जीना** पलंगावर निजलेली आहे असा पडदा उघडतो. )

**समशेर०**—( प्रवेश करून ) भाऊसाहेबका ये हुकूम् आया हय् के दुरानी आपने नज़्दीक आया हय्. कल् सुभों सब् लोगोंने आप्ने आप्ने हत्यार लेकर तयार रहेना. मेरा दोस्त खिज़्रखान पठानकी मिजास मुजे बहोत्‌ही पसंत होती हय्. मेरे सात् कैयसा मिठी मिठी कलाम् निकालता मानिंद तोतेके. हुसन्‌की क्या खूप्सुरती हय्, गोया एक परी हय्. उमर देखा तो चौदे पंधरे सालकी, लेकिन् जवामर्दीमे मेरा साम्ना करनेकू तय्यार. ये खिज़्रखान् पठान, बादजंगके अगरचे मेरे सात् दख्खनकू आया तों मय् उस्की सरबराई उस्के दर्जे मुवाफिक रखूंगा, अप् उस्के डेरेमे जाके मेरा इरादा ये हय्, के उस्कू जंगके बारेमे इतल्ला देना. और उस्कू कल् साम्ना करनेके वास्ते हुश्शार करना. अप् मय् उस्के डेरे नसदिक् आके प-

हुंचा. मय् समजताहूं के पठान खिज्रखान, नींदमे मषगूल् होगे. अब् इत्ने रातकू ये मेरा दोस्त समशेरबहादर ये मकान् कैय्सा पाया, इस् बारेमे उसकू अजब् ताजूबकी बात होगी. ( एकाएकीं दचकून मागें सरतो. **शिद्दी मकांडा** हातांत कट्यार घेऊन **खिजरखानाचे** पलंगाचे आसपास काव-याचाव-या नजरेनें पाहून खून करावयाचे बेतांत आहे, असें समशेरबहादराचे ध्यानांत येऊन, तो त्याच्या हातांतील कट्यार दबत दबत जाऊन हिसकावून घेतो, व तीच कट्यार त्याचे छातींत खुपसून प्राण घेतो. या झटपटींत **मर्जीना** जागी होऊन पलंगाखालीं उडी टाकते व **समशेरानें** आपणास पाहिलें, म्हणून लाजून उभी रहाते )

**समशेर०**—पर्वरदिगारके राय्से अपूके बदकामाकि, ये सजा पाया. मगर माषाअल्ला ! ! ये मेरे आखे क्या देखते हय् ? क्या मय् नींदमे हय् ? ये जादू क्या हय् ! क्या मय् खवाप्ये हय् ! क्या मेरे आखे मुजे फुसलाते हय् ! मेरा दोस्त ये खिज्रखान परी कैय्सा बन्गया. खिजरखान, मेरा इरादा ये था के तुजे पूनेकू ले जाऊ; और तेरेकू बडी जायदाद दिलावूं. मगर मेरे आखे मेरे सामने कौन् दिखते हय् ? ये शिद्दी कौन् हय् ? इरादा इस्का तेरा खून करनेका क्यंव हुवा ? वल्ला, इसमेसे मुजे कुच्भी मालूम नहि होता. कल् जंग होनेवाला हय्. दुरानी आपके नजदिक् आया हय्. इस्लिये मय् तेरी मसलत् लेनेके वास्ते इस वखत इयां आया. येलाहीके कुदरतसे तेरी जान् मेरे हात्से बच गयी. मगर इस् बातोंका मेरेकू बयान् कर.

**मर्जीना**—जनाबेमंद, ये बंदी बहोत् लाचार हय्. इस् हालतमे मुजपर करम करना. सौदके तोबा करतीहूं. बंदीका जिकर आय्सा हय्, के मय् वजीर गाजीउद्दीन्की छोटी भेय्न हय्. मेरा नाम मर्जीना. मुजे और मेरे फुपूकूं हरामजादे नजीबखानने गिरफ्दार करके कय्द्खानेमे रखाथा. उस्का दिल् मेरा दूला बन्नेका था. ये शिद्दी मकांडा जिस्पर जनाबने कट्यार चलाई, वो दिनरात् मेरे उपर पेहेरेपर था. अब् मेरा खून करनेके वास्ते, नजीबने इस् काले सुग्तकू इनाम देके भेजा होगा. एक दफे रातके वक्त मेरे फुपूनें मुजे तनब्बी-

मेसे रस्सीके जोरसे जमीनपर छोड दिया. फिर मय् खिजूरखान बन्के आप्के दरबारमे आयी. अव्वल इरादा ये था, के भाई गाजीउद्दीनकू मिल जाऊं, मगर खुदाने ऐयूसा वक्त नहि लाया. आब् मेरी अब्रू आप्के हातमे हय्. मेरेकू मेरे भाईके तरफ् आप्ने भेज देना. और इस बातोंका किसीके पास लब्हज् न निकालना. आप्कू खुदाकी कसम हय्.

**समशेर०**—तेरे सरीकी जवामर्द और खुपसुरत औरत मयूने अपने सब उमरमे नहि देखा. क्या तेरी जवामर्दी! ऐसे मापूक और नाजूक गुलाबके फूलकू ओ बद्माप् नजीबखान आपनी लवंडी बनाताथा? तेरे मकानमे गुलाम होके तेरेपर अमलाफेला करताथा? खुदा करे तो ये कट्यारसे मय् उसकू सफा करूं तों रावबाजीका फरजंद्. मर्जीना, तूं इतनी तिरंदाजी, और तलवारकी चमक, ओर भालेकी पकड, कहां पढचुकी? घोडेपर सवार होनेवाली तो दरजे अव्वलकी—जैसी अस्मानसे परी चलकर आती हय्! क्या मेरा तक्दीर बडा हय् के ऐसे नाजुकु और जवामर्द दोस्तोंसे खुदाहुतालाने मुलाकत् कर दिया.

**मर्जीना**—मय् समजतीहूं दूसरेकी तारीफ् करनेका इलम् आपकू दरजे अव्वलका हय्. क्या मेरी जवामर्दी? मय् तो जातकी औरत, कमताकत; निहायत उमदा आपकी जवामर्दी जनाबेमंद् जनकोजी शिंदे, सुभेदारसाहेब मल्हारराव होळकर, दमाजी गायकवाड, सरदार बलवंतराव मेहंदळे. ऐसे ऐसे काबील् लडनेवाळे, घोडेपर सवार होनेवाले दरजे अव्वलके, इन् लोगोंकी आपने तारीफ करना. मेरा भाई गाजीउद्दीन छोटेपनसे मुजे बहोत प्यार करताथा. हातीपर और घोडेपर हमेशा बिठाताथा. उसने मुजे तिरंदाजीका इल्म्, तलवारकी चमक्, भालेकी पकड, और शेरकी शिकार, वगैरा पढाया हय्. ओ तो इस् बातोंमे बहोत् काबील् हय्.

**समशेर०**—तुमारे भाईके मिजासकी तारीफ हमारे दादासाब बहोत करतेथे. गाजीउद्दीनसाहेब फिल्हाल् किले कुंभेरीमे हय्. बातजंगके आप् दोनो मिलके उनके मुलाकतके वास्ते जायेंगे. तुजकू देख-

के उनकू बहोत खुषी होगी. मर्जीना ये मर्दका लिब्वाज तुने कहांसे लाया? अगरचे ये कालेसुरत तेरेकू खंजरसे मारताथा, तो ये समसेरका कलिजा तुट जाताथा. बदमाष नर्जीबखान ऐसे नाजुक् तनूपरकस्यार चलाताथा? साला जानूवर हय्. गध्धा हय्. खुदा उसकू सजा करे. उसका सत्यानाश, खानाखराब हो जायूगा.

**मर्जीना**—आप बहोत रहेमदिल् हय्. मय् निंदमे मषगुल् थी, नहि तो शिद्धी मकांडा मय् बंदुकसे उडादेती गोया एक कवा. मयूने मर्दका लिब्वाज नजीबखानका चोरके लायाथा. मेरे फुरने मेरेवास्ते पैदा किया. वल्ला जबतक् मयूने मर्दका लिब्वाज पेनाथा, तबतक् मेरे तनमे मानिंद मर्दोके ताकदथी. आपसे फराकतसे बाते करनेमे मुजे बहोत शरम मालूम होती. ( लाजून पदर घेते. )

**समशेर०**—( आनंदानें वेडावून जाऊन ) खिजूरखानकी मर्जीना बनी. सुभान अल्ला!! मगर मर्जीनाका फिर खिजूरखान हुवा तो मेरेकू बिलकूल पसंत नहि. बीबी मर्जीना, तेरे भाईके तरफ् तेरेकू ले जाताहूं. ये तेरे दिलकी खायष् पूरी करनेक् ये बंदा कुबूल् हय्. मेरे भाई रघुनाथराव दादासाहेब एक दफे कयूतेथे के गाजीउद्दीनकी खुपसूरत मेयून बीबी मर्जीना. वास्ते शादीके पूनेकू आनेवाली हय्. खुदाहोतालाने कैयूसा मौका लाया हय्. तेरे आनेकी खबर मय् भाऊसाहेबकू तूं हुकूम करे, तों कयूताहूं. नहि तों ये किस्सा आपूआपसूमे रहूने देव.

**मर्जीना**—ये जिकूर मय् नहि जानती मुकूरर. ये सरासर इन्साफीकी बात हय्, के वजीर गाजीउद्दीन गनीमका हय् नौकूर, वास्ते इसूके ये बंदीकी आपूके उपर हय् मदार. अगर आपूकु इस् कामोकी कुच हो कदर, तो मुजे लेचलो भाईके सदर. वोहि मेरा हय् पिदर मादर, उसूके पास मय् सादर करुंगी तुमारा जिकर. फिर आप् दोनो कुबूल् करेंगे आपूना शिकंदर.

**समशेर०**—अयूसे कामके वास्ते कुच तुमारा दाम थौडे खरच होता हय्? मय् सलाम् करके इस् जबान्से कलाम् करताहूं, के येहि मुकाम्पर इमामके कसूम मय् नहुंगा तेरेसे बदलाम्. गव्हा इसूकू बारा

इमाम्. खुदाहुताला आप् दोनोकू आन्जाम देके आपकू सलामत् र-खेगा. मय् तेरे भाईकू दिलावुंगा वजिरातका काम, जानी मर्जीना खुदाके वास्ते तूं मेरा केहना मान्ले. नहि तो ये समशेर—

**मर्जीना**—जनाब अब् ये ख्याल करना, के मय्ने बेताल् होके आप्का बोल कुबूल किया, तो मेरा भाई मुजकू न कहेगा काबील, फिल्हाल् मय ये जालमे फसगयी हय्. अगर आप् कौल्के सच्चे हो, तो मुजे खुला कर दो.

**समशेर०**—प्यारी मर्जीना, अगर तूं मेरे नजर न पडती तो मय् तेरे तालाष्के वास्ते देहलीमे थोडे. घुमता ! मगर ये तेरे मर्जीकी बात हय्. तेरा भाई, ये बातोकू बुरा कब्बू न कहेगा. ये यकीन् हय्. तेरा हात पकडके तेरेकू ये मुफलसीमेसे दूर करताहूं. ( तिच्यापुढें गुडघे टेकून तिच्या हाताचा मुका घेतो. )

**मर्जीना**—( त्याच्या गळ्याला मिठी मारून ) शादमानी सुलतान समशेरबहादुर आप्के वास्ते ह्यां आयीहूं. मेरेकू नजीबने बहोत् सताया हय्. इस्का बदला आप्ने लेना चाहिये. कुतुबशहाकू कतल् किया. अब् चंद्रोज्से पर्वर्दिगार आयुसा मौका लावेगा के नजीब आप्के ताबेमे मानिन्द् उस्के पीरो मुर्शद्के मिलेगा. मेरा भाई वजीर हुवा, अगर आप्को वजीरात मिल्गयी, तोभी मुजे ऐन् खुषीकी बात होनेवाली हय्.

**समशेर०**—शाद्मा ! शाद्मा ! ! शाद्मा ! ! ! मय् तेरेसे कबी नहूंगा बेइमान्. अब् जानी, तुजे लेके भाऊसाहेबके और रावसाहेबके कबीलेमे उन्के बीबीसाहेबकों मिलनेके वास्ते लेजाताहूं. भाऊसाहेब मेरे बडे भाई हय्. हमारे बाबा जान् जनाब बाजीरावसाहेबने मुसलमीन लोगोंकी बीबी मस्तानी मेरी वालिदा निजामके तरफकी लायी. मय्ने बीबी मर्जीना देहलीके तरफकी लायी.

**मर्जीना**—बाप्से बेटा सवाई. चलीये साहेब. अब् इस्तूकबीलेसे मय् खिजूरखान कबी न होनेवाली. मुजे गोषेमे रेहेना चाहिये. ये बात आप्कु कुबूल होना चाहिये. ( उभयता जातात. )

---

## प्रवेश २ रा.

**स्थळ**—पानपत येथील भाऊसाहेबांची छावणी.

**( विश्वासराव व जनकोजी शिंदे प्रवेश करितात.**

**जनकोजी**—बारा घटका रात्रीचा डंका पडला, त्या वेळीं मला बातमी समजली कीं, दुराणी फौजेसुद्धां यमुना उतरून आला. येथून बरोबर पांच कोसांवर त्याचे फौजेनें तळ दिला आहे. आम्हीं बातमी-करितां बाजी हरी, भगवंतराव कदम, व येसोजी मोयटे, सात हजार फौजेनिशीं पाठविले होते. हे सगळे लोक गाफल राहिले. गिलचे एकाएकीं येऊन आमच्या लोकांत सरमिसळ झाले. आपल्या लष्क-राच्या ढाला नजरेस पडेपावेतों गिलच्यांनीं पाठलाग केला. बाराशें स्वारांचीं डोकीं कापून नेलीं. ही बातमी ऐकतांच सगळ्या फौजेची छाती मावळून गेली. दिल्लीस जाण्याची हिम्मत होती, ती जागचे जागीं राहिली. फौजेंत अन्नाचा दुष्काळ पडत चालला आहे. आतां तर दिल्लीची वाट दुराणीनें दाबली आहे. भाऊसाहेबांनीं दुराणीचा तळ येऊन पडतांच हुकूम केला कीं, बत्तीस हात रुंद आणि आठ हात उंच असा खंदक समोंवार करून, चौफेर आराबा पसरून, पानपत मुक्का-मींच छावणी करावी. बरें, पण रावसाहेब, कालच्या पत्राचें काय केलें?

**विश्वास०**—मीं कालच नानासाहेबाला पत्र पाठविलें आहे कीं, दुराणीचा पेंच फार पडला आहे. निभावणी लागण्याचें चिन्ह दिसत नाहीं. भाऊसाहेब अभिमानी असल्यानें यांतच गर्द होतील; परंतु आपलें व्यंग कळविणार नाहींत. करितां तातडतोब पन्नास हजार फौज आणि कोट रुपये खजीना पाठविला तर तुमचीं आमचीं दर्शनें होतील; नाहीं तर हीच भेट. आमच्यासारखे तुम्हांस पुत्र आहेत, आणखी होतील; पण भाऊसाहेबासारखा बंधु मिळणार नाहीं असें मीं त्यांना पत्रांत लिहिलें आहे. आतां अन्नाचा दुष्काळ पडत चालला. सुरजमल जाट हातचें निधान घालविलें. पैसा शेर पीठ पैसा शेर हर-भरे, सरसा लढाई केली तर, पुरवीन, ही त्याची प्रतिज्ञा. होळकराची हेटाळणी करितात. ज्याच्या त्याच्यावर तोंड टाकून हुरमत घेतात.

**भाऊसा०**( जोरानें प्रवेश करून ) कोण हुरमत घेतात ? कोण तोंड टाकतात ? तुला नानासाहेबांकडे जायचें असेल, तर या घटके-ला रवाना करतों. कडानिकड करून दिल्लीस पावतें करतों. दिल्लीहून पांच हजार फौज बरोबर घेऊन, दक्षिणेंत निघून जा. माझ्याविषयीं विचा-रशील तर माझीं शंभर वर्षें आजच भरलीं आहेत. मला चोरून नाना-साहेबांना पत्र ? फौजेची काय गरज ? कोट रुपये खजीना कशाला पा-हिजे ? गोविंदपंत बुंदेले चाळीस लाख रुपये घेऊन दिल्लीस आले. त्यांना मीं तसेंच परभारें अंतर्वेदी प्रांतीं जाऊन दुराण्याची रसद बंद करून टा-का, म्हणून हुकूम पाठविला आहे. तुम्ही इतके दम का सोडतां ? एकाएकीं दुराणी यमुना उतरून आला, आतां उपाय काय करावा हें सुभेदार अनु-भवशीर, पोक्त, म्हणून त्यांना मनसुबा विचारण्यास माणूस पाठवि-ला, तों जबाब हा कीं, “ हा विचार बळवंतराव मेहेंदळे यांस विचा-रावा, आम्हांस कांहीं मसलत सुचत नाहीं, आमची साठीं बुद्धि नाठी झाली. ” हें उत्तर मला काय ? सगळ्यांचे वाग्बाण मला सहन केलेच पाहिजेत. तुमचा बेत काय आहे मग, रावसाहेब ?

**जनको०**—सरकार पोरावर काय रागावता असें ? लिहिलें पत्र म्हणून कांहीं हरकत आहे काय ? मींच त्यांनां सल्ला दिली होती. अशा वेळीं वडिलांस पत्र लिहूं नये, तर मग दुराणीला का लिहावें ? रावसाहेब तुमचें लेंकरूं आहे. तुम्ही त्यांच्यावर रागावलांत, तर त्याची समजूत कोण करील ?

**विश्वास०**—काका, तुम्ही मजवर फार रागावला काय ? याउपर मी पत्र लिहिणार नाहीं, आपली सल्ला घेतल्याशिवाय कांहीं काम क-रणार नाहीं. आपल्या पायांवर हात ठेऊन शपथ घेतों. क्षमा करा. मी मूल आहें.

**मल्हार०**—( धावऱ्या धावऱ्या प्रवेश करून ) गोविंदपंत बुंदे-ल्यांचा शिरच्छेद झाला. त्याच्याबरोबर दीडहजार लोकांची मुंडकीं छाटलीं गेलीं. बुंदेले यानें मिरतपावेतों अशा रीतीनें सर्व रस्ता बंद करून टाकला होता कीं, शहाच्या लष्करांत शुद्ध भराडी कणीक दोन रुपयांनीं शेर विकूं लागली होती. तेव्हां शहानें वजीर शहावलीखान

याचा पुतण्या आतईखान, अहमदखान लंगडा पठाण, यांस पंधरा हजार फौज देऊन गोविंदपंतावर रवाना केलें. अविंधांनीं मोंगलाई मसलत करून, आमचीं निशाणें उभारून गोविंदपंताच्या फौजेंत घुसले. गोविंदपंताला वाटलें कीं. नारोशंकरांनीं आम्हांस फौजेची कुमक पाठविली आहे. कांहीं केल्यानें जाग्यावरून हालेनांत. शेवटीं गिलचे सरमिसळ झाले. गोविंदपंत शत्रूंच्या हातीं जीवंत सांपडले. कोट रुपये देऊन जीवदान मागूं लागले, पण त्यांना दया आली नाहीं. आतईखानानें डोकें कापलें, सर्व फौज उधळून गेली. " मुरगी मारी बचडे दाणादाण " अशांतली गत झाली. शहानें डोकें पाहतांच त्याला फार खुषी झाली. आतईखानाला सन्मानाची खिलात दिली. पंताचें शिर ताटांत घालून आपल्याकडे नजर पाठवून तोंडीं असा संदेशा पाठविला आहे कीं, तुमचे गोविंदपंत पुढें तुम्हांस स्वर्गीं जागा पहावयास गेले आहेत. तुम्हांस न्यावयास शिर पाठविलें आहे. होय कीं नाहीं तें कळवावें.

**बळवंत**०--( धांवत येऊन ) भाऊसाहेब ! बुंदेल्याचें असो. पण हा दुसरा मोठा घात झाला. बुंदेल्याचे चिरंजिवानें पाराजीपंत वाघाबरोबर चाळीस लाख खजीना रवाना केला. एका दिवसांत ते कच्चे चाळीस कोस जमीन चालून आले. पण काल रात्रीं, ते आपल्या छावणींत येण्याचे ऐवजीं, चुकून, सुजाउद्दवल्याच्या छावणींत गफलतीनें शिरले. छावणी कोणाची आहे, म्हणून त्यांनीं अगोदर तपास केला, त्या वेळीं ' इब्राहिमखानाचा गोट ' असें शत्रूंनीं खोटें सांगितल्याबरोबर, हुक्याचे तलफी होते तेवढ्यांनीं घोड्याखालीं उड्या घातल्या. तेही तिकडून एकदम लेव गांजा, लेव तंबाखू' करीत एकदम समशेरी घेऊन उठले. सुमार हजार स्वार छाटला जाऊन खजीना लुटला गेला.

**भाऊसा**०( एकीकडे ) अरेरे ! ! मोठा घात झाला ! दोन्ही गोष्टी मोठ्या घातक झाल्या. बुंदेल्याचें डोकें या डोळ्यांनीं पहाण्याचा प्रसंग आला ! आह्मी गनीम, आम्हीं मोंगलाचें अन्नपाणी बंद करावयाचें तें न होतां आमचाच आटा त्यांनीं बंद केला. सर्व उपाय हर-

त्यासारखे झाले आहेत. पुण्याकडून कुमक होण्याची आतां आशा नाहीं. कारण मुख्य दिल्लीचा रस्ता अडवला गेला. सर्वांत वाईट गोष्ट ही झाली आहे कीं बायकामुलें आम्हीं समागमें आणलीं. आतां मी जर त्यांना, धीर सुटल्यासारखें दाखवीन, तर सगळी फौज दम सोडील, सगळें दुःख मला गिळून गेलें पाहिजे. कुंजपुरा सर केला, त्या वेळची माझी हिम्मत कोणीकडे आणि आजचा प्रसंग कोणीकडे ? ( उघड ) सुभेदारसाहेब, जनकोजी शिंदे, बळवंतराव मेहंदळे, लढाईंत असे प्रसंग वारंवार येतातच. यांत तुम्हासारख्या वीरांनीं घाबरून जाऊं नये. चाळीस लाखाची बिशाद् काय ? तमाम लष्करांत जेवढीं सोन्याचीं कडीं तोडे असतील, आणि जेवढे चांदीचे जिन्नस, म्हणजे हत्ती घोड्यांचा साज तेवढा आटवुन टाका. भाऊशाई, मल्हारशाई, आणि जनकशाई, अशा मोहोरा आणि रुपये पाडा. तमाम लोकांस तनख्याचा बटवडा करून द्या. कांहीं भिण्याचें कारण नाहीं. चाळीस लाखांचे बदली चाळीस कोट घेऊं, तरच आपण नावांचे मराठे. बुंदेल्याचे बदली, अहमदशहा अबदल्लीचे शहाजादे घेऊं. त्याला असा निरोप पाठवा कीं, " स्वर्ग ही जागा सर्वत्रांचीच आहे, प्रस्तुत, तुम्ही थोर कंदाहारचे पादशहा, तुम्ही तेथें जाल, तेव्हां तुमच्या इभ्रतीप्रमाणें मान झाला पाहिजे; म्हणून तुमचे मेजवानीस गोविंदपंत बुंदेले साहित्याची तयारी करण्याकरितां गेले आहेत. " बुंदेल्यांचा सरंजाम त्यांच्या चिरंजिवाच्या नांवें करावा असा अंताजी माणकेश्वरास हुकूम करा. आतां लढाईची तजवीज काय करावयाची ती काढा.

**बळवंत**०—भाऊसाहेब, तुमचे शिंदेहोळकर एवढे लढवय्ये, मग त्यांची कां हिंमत अगदीं खचल्यासारखी दिसते. जसें एखादें मनुष्य दहावीस कोस चालून यावें, आणि तें दमून बसतें, असे हे दमल्यासारखे हवालदील दिसतात. सुभेदार तर वृद्धच आहेत. "आपलें वेजीं उतरलेलें मोतीं " त्याची काय किंमत येणार ? मला वाटतें आपण हिंदुस्थानांत आलों यामुळें हे बहादर कमजोर झाले. नाहींतर त्यांनीं पराक्रम करून दाखविले असते.

**मल्हार**०—( एकीकडे ) आतां जर या ब्राह्मणाची छाती उ-

तरली तर इकडे श्रीमंत एकेक डोळा एवढाला करतील. हें तुपाचें घागरीवर उंदराचें पिटकुलें आहे. आपली गोष्ट हांसल्यावर न्यावी म्हणजे झालें. बाकी हें बेअदबीचें भाषण, जनकोजी शिंद्याला खप णार नाहीं. कारण ताजें रक्त आहे. तें उसळणारच. ( उघड ) दिवाण-साहेबांचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. ( हंसत हंसत ) तुमच्यासारखे तरणेबांड असल्यावर आम्ही बुद्धयांनीं स्वस्थ बसावें हेंच उत्तम आहे. आतां आमचे अंगीं ऐन पंचींविशीचा जोम थोडाच राहिला आहे?

**जनको०**—( त्वेषानें ) बळवंतराव, आमची हिंमत खचली म्ह-णतां, तुह्मीं कोणता दिग्विजय केला आहे? तुम्हीं काय शौर्याचे झेंडे लावले आहेत? आणखी तुम्हांस या जनकोजीचा पराक्रम पहा-वयाचा असेल, तर उद्ईक पाहून घ्या. भाऊसाहेबांकरितां आह्मीं तुमची मुरवत धरतों, हजार वेळ गम खातों, समजलांत? तुम्ही स-रदारघराण्यांतील मोठे मनुष्य, खानदानीचे, दुसरा कोणी हलका इसम असता तर जबान छाटून हातांत दिली असती. तुमचा दर्जा कोण? आमचा दर्जा कोण? ह्याचा कांहीं तुम्हाला विचार? मला बोलल्याचें असो, पण हे सुभेदार, तुम्हां आम्हांला वडील शोभतील, त्यांना भाऊसाहेब बोलतात म्हणून त्यांचे जोरावर तुह्मीं वेजीं उतर-लेलीं मोर्ती, म्हणून भाषण करितां? याचा कांहीं तुम्हांला शरम? जों जों मनुष्य सबूर करतें, तों तों चढाचे जाबसाल जास्तच. बेलाशक बेजबाब तोंडांतून काढतां? सरकारचे पायाला हाच मुजरा. उद्यां फत्ते झाली, तर सरकाराला तोंड दाखवीन, नाहीतर हीच भेट. ( त-डक रागानें जाऊं लागतो. )

**भाऊसा०**—जनकोजी असे रागावून जाऊं नका. परत या.

**जनको०**–मुजरा झाला. आतां बसायचा नाहीं. (रागानें जातो.)

**भाऊसा०**--बळवंतराव, तुम्हांला काय म्हणावें? जनकोजी शिंद्याचे वाडवडील आमचे सेवेला कामीं आले. एवढें कायतें वंशाचें शेवटचें फळ राहिलें आहे. तुह्मीं वर्मी घाय मारून जनकोजीसारखा मोहरा इरेस घातलात. यांत तुम्हांला काय पुरुषार्थ वाटला असेल तो वाटो. आतां तावडतोब हुजुरातीची फौज तयार करून त्याला

झटून मदत करा. उठा, चालते व्हा. ( बळवंतराव जातो ) सुभेदारसाहेब, जनकोजी मूल आहेत, त्यांची वडीलपणानें समजूत करून, त्यांना परत आणा. तुह्मीं कांहीं जाऊं नका. फौज मात्र तयार असूं द्या. ( भाऊसाहेब जातो. )

**मल्हार०**—पाहिली रावसाहेब हुकुमाची तऱ्हा. आतां आम्ही जावें तर भाऊसाहेबांला राग येणार. न जावें तर पोर एकटें गेले. पांढरे केसाला बोल लागतो. हा मेहेंदळे खऱ्या दिलदारपणानें मदत करणार आहे का ? आतां मला काय मसलत देतां ?

**विश्वास०**—सुभेदारसाहेब, आपल्यासारखाच मी सासुरवासी आहें. पण मी इतकीच सल्ला देतों कीं, संताजी वाघमारे, बुंदेल्यांचे चिरंजीव, व भोजराय असे तिघे दहा हजार लोकांनिशीं मुकाट्यानें मदतीला पाठवून द्या. आणि आपण स्वतः मागचे बाजूला लांब उभे रहा. वेळ आहे, प्रसंग आहे म्हणून म्हणतों, शिवाय बळवंतराव जाणारच आहेत. ( उभयतां जातात )

---

## प्रवेश ३ रा.

### स्थळ—गिलच्यांची छावणी.

( **अहमदशहा** उंच उभा राहून दुर्बिणीनें लढाई पहात आहे. जवळ **सुजाउद्दवला** उभा आहे. )

**पादशहा**—एल्आम्दुलील्ला क्या धूम चल रही हय्. मय् समजाताहूं के थोडे आरसेमें ये जंगका नतीजा होगा. नजीबखान और लंगडा पठान् बडे हुश्शार लडनेवाले हय्. क्या समशेर चल रही हय्. जैसा बादल्मे बिजली. अब्बी देखो सब् तोफकूं एकदम बत्ती लगाया. ( आवाज होतो ) वाः ! वाः !! वो पीछे हटगया वो कौन् हय् नबाबसाहेब ? शायत् आपके पयछान्का होगा. ( त्याच्याजवळ दुर्बीण देतो. )

**सुजाउ०**—सरकारे आली, वो संताजी वाघमारे करके होलकरका सरदार हय्. क्या आप्ने लोक उस्कू पीटते हय्, मानिन्द बि-

होके. अब् भाग गया हय्. ठेहरा. अब्बी येक् जाय् पर ठेय्रा. सिंदा जनकोजीकी मिनतवारी करता हय्. बडेबडेसे हरहरमहादो करके कलामके पीछे कलाम निकालने हय्. आपने लोग दीन दीन करने हय्. दोनो रिसालोमें तफावत एक हातका नजर नहि आता. जेजाला, कडाबीन, सुतारनाला, गरनाला, जंबुराख, बंदूक, तमंचा वगैरे लेके आप्ने लोग, ऐय्सी बत्ती लगाते हय्, के एक लेहजेमें गनीमकी तमाम जमीयत् नेसूत नाबूत हो जायगी. अरब लोग्, हबशी लोग्, गोसाई लोग्, लुटनेवाले पेंढार लोग्, करबलवाले, एककांडे, भालेवाले ये तमाम शिंदे होलकरकी जमीयत् होगी. होलकर जातसे तो हातीपर नजर नहि आता.

**पादशहा**—नबाबसाहेब, आपने ये देखा क्या ? मय् समजाहूं, अलबत्ता पचीस हजार लोग् होगे. सिरफ नंगे हत्यारसे खडे हय्. और उन्के आगे दख्खनका एक बमन् घोडेपर सवार होके टेहलता हय्. येहि वो शैतान भाऊसाहेब हय क्या ? जरा नजर तो कीजिये.

**सुजा०**—क्या नमक् हराम् हय् ? सिंदा जनकोजी आपनी फौज लेकर अकेला जंग करता हय्. और ये मतलबी खाली तमाशा देखता हय्. जनाबेमंद, ये सरदार बलवंतराव मेंहेंदले करके हय्. ये भाऊसाबका साला हय्. ( आकाशाकडे पाहून ) या खुदा, ये बळवंतरावकू देखके मेरा कलीजा घबराना हय्. अगरचे इन्ने हमला किया तो बुरा काम हय्. मगर जनाब ये खाली क्यंव खडा हय् ? ये अकलमंद हय्. या दिवाना हय्. खुदा करे तो इन्ने ऐसाहि खडा रेहना. फिर खामखा आप्नी फतेमंदी होनेवाली ठेयरी, अब् दीन डुबनेका वक्त आया हय्. गनीमके तोफकी फैर हुवी. ( आवाज होतो. ) ओ हो हो ! ! या अल्ला ! ! ये क्या मय् देखताहूं ? आप्ना रिसाला तमाम भागने लगा. छावनीके तरफ लोट आता हय्. तमाम् गनीम मानिन्द कुत्तेके, आप्ने आप्ने दखनी टट्टू लेके आप्ने लोगोंके पीछे लगे हय्. मूसे हर हर माधो बोलते हय्. गिरते हय्. कुदूने हय्. मगर और फिर टट्टूपर सवार होते हय्. क्या आपने लोगोंने गनीमकू पीट बताया ?

मय् समजताहूं कुच नशा किया होगी. नामर्द हय् साले. मेरेकू अयसा गुस्सा आया हय् के ये लोगोंकू मय् आपूने हातसे कतूल करूं ( एक मुसलमान शिपाई पळत येतो. )

**पादशहा०**—मारेगा एक लाथ तेरे पेटमे. तेरेकू शरम नहि-आति ! तेरे बापदादे उदर लडते हय्, और तूं मानिन्द गद्धेके भागता हय् ! सिपाई हय् या कोन् हय् ! चल् आगे बढ.

**शिपाई**—( तोत्रा आवाज काढून ) प–प–प–प–परवरदिगार, फि–फि–फि-फि–फिर जाऊं तो म-म–म–म–मर जाऊं.

**पादशहा**—( त्याला लाथ मारून खालीं पाडतो. ) ये साला दख्खनका अदमी होगा. तेरेमे कुच तेज नहि. अये एह्मक, तेरी जबान् क्या गनीमने सफा किया क्या? तो तू परर्र् वर्र्र् फिर्र्र् करता हय् !

**शिपाई**—( घाबरून लट लट कांपत ) ड–ड–ड–ड–डर मालूम होता हय्. लढाईका जिकूर स–स–स–स–सरासर ये हय् के गनीमने कुच क-क–क–क–कदर न करके, आपने लोक एकसा कतूल किये.

**नजीब०**—( **अहमदखान, लंगडा पठाण बरखोदार-खान, काशीराज पंडित** वगैरे सर्व लश्करासुद्धां घायाळ झालेले कपडे रक्तानें भरलेले असे धांवत येतात. **नजीबखान पादशहाचे** पुढें आपलें डोकें व पागोटें आपटतो. रडत रडत बोलतो. ) मेरा मामु खलील्उल् रहिमान् कट् गया. मेरा समदी, मेरा दामत्, मेरे पीरो-बक्ष, मेरादोस्त सयमतखान, चार हजार जमीयन, तमाम वो गनीमने काटा. या अल्लाये क्या बला ? नबाब सुजाउद्दवलासाहेबूने बहोत कुसूर किया. वास्ते जंगके बदस्तूर मेरे सात आये नहि. नहि तो दीनका डंका आज् बज् गयाथा. नबाबसहोब, सल्ला करनेकी राय देते हय्. मय सम जताहूं के, गनीमकू नेस्त नाबूद करना. उन्का लहू पीना. तमाम गनीम शिकस्त करना.

**सुजाउ०**—नजीबखान, मेरा नाम तुम खाली बदनाम करते हय्. ये मेरे कामकी बात नहि. चाहिये तो येहि तुमारा हमारा स-लाम हय्. गुलामके सरीके लोग् अयूसे बडे काममे पडे, तों एक छदामभी गनीमसे पयदा न होगा. ( रागावून जाऊं लागतो **पाद-**

शहा उभयतांचे हातांत हात घालून दोघांस खालीं बसावितो. )

**पादशहा०**—तुम् दोनो बच्चे हय्. तुमे दोनोकुं, लढाईका बिल्कूल् महावेरा नहि. एकके उपर दुसरेनें खपा होना, बेजबान् निकालना, गम न खाना, चले जाना, भाग जाना, ये कुच अच्छा जमाना नहि. तुमे सामना गनीमसे देनेका-हो, तो सबूर करो. अब् अनाजका काल उनमे पडा हय्. सबका इंतकाल होजायगा. तमाम भुके प्यासे मर जायगे. जंगकू आये तो मार खायगे. नजीबखान तुम् औरतसरीके रोते क्यं ? तुमारे पांच अद्मी मरे और गनीमके सेकडों तुमने मारे तों ! दत्ताजीकु काटा, महिपतकू काटा, बुंदेलेकू काटा. शिवाय दो तीन हजार लोग् इनूके सात काटे. इस् बातोंमे तुमे कुच रंज् हय् ? मारना मराना, डरना, डराना, भागना, भगाना, खुदाका काम हय्. फिर दुसरा, जंग करेंगे. तुम फिकर मत करो. तुम दोनो आप्आप्ममे लडे तों हमभी खंदारकु चले जाते.

**नजीब०**—ऐय्सा न किजिये जनाब. फिर हम् तमाम लोग गनीमसे कत्ल किये जागये. मेरे दिलकू ये जनकोजी मानिंदरुस्तुमके नजर आतां हय्. जातसे मेरे नज्दीक आके, मेरे रूबरू मेरी चार तोफ छिन लिया. तोफ जबर. खींचनेकूं बयल् नहि. इस् वास्ते उनके कानेमे उसने खीले मारे. क्या उस्की जवा मर्दी. तोबा ! तोबा ! ! अगर इस् वक्त वो बम्मन् बलवंतराव हल्ला करता तों. मय् समजाताहूं के आज आप् तमाम लोगोंका हमारे सामने इन्तकाल होता था. खुदाहुतालाने उसकू ऐसी राय् दियाके, मानिन् हेलेके खडा रहेना. खाली तमासा देखना. बलधंतरावके हातसे परवरदिगारने आज तमाम जमीयत्कू बचाया.

**पादशहा०**—जो हुवा सो हुवा. सुबुर करना चाहिये. तुम् अब् सब् लोक मेरे सात मेरे तंबुमे तशरीफ् ले चलो. तुमे जिआफ्त दिलाताहूं. बाद जिआफ्त के तमाम जमीयत्कु एकसा एक दिल करके अब्बीके अब्बी जाके वो गाफिल् गनीमोपर हम्ला करेंगे.

( सगळे जातात. )

---

## प्रवेश ४ था.

### स्थळ--पानपत कर्नोलची टेंकडी.

( बळवंतराव मेहेंदळे प्रवेश करितो. )

**बळवंत०**—माझें मन मला आतां फार खातें आहे. त्या वेळीं मीं जर घाव केला असता तर या घटकेला आजचे आज हे ताम्र-मुखी राक्षस नामोहरम झाले असते. मला वाटलें, शिंदे होळकरांच्या फौजेनें खस्त खाल्ली आहे, दुराणीच्या पुढें त्यांना दम निघणार नाहीं, जनकोजीनें पलटा खाल्ला कीं, आपण पुढें घोडे घालून फत्ते मिळवावी. ही आमची ब्राम्हणी बुद्धि महा खोटी, जनकोजी शिंदा कसला अ-भिमानी, तो म्हणून माघारा फिरला नाहीं. इतकेंच नाहीं, तर जो मराठा माघारा फिरला, त्याला त्यानें तेथल्या तेथें छाटून टाकला. मग काय दहावीस शिपाई असे मारल्यावर मराठ्यांनी दुराणीची नु-सती लांडगे तोड चालविली. " शाबास माझे जवानबहादर मराठे गडी, शाबास, भले मर्द, " असे म्हणून दौंड करून जनकोजी दुराणीवर वाघाप्रमाणें तुटून पडला. असो आतां काय ?

( **समशेरबहाद्दर** व **इब्राहिमखान** प्रवेश करितात. )

**इब्राहिम०**—क्यं समशेरबहादरसाहेब, जनकोजीकी क्या ताक-द! क्या जवामर्दी ! लढनेमे बडा काबील् मानिन्द अलम्गीरके हमा-रां इरादा उस्कु मदत करनेकाथा. लेकिन् ओ बोले के हमे किसीकी गरज् नइ.

**समशेर०**—मेराबी इरादा आपके सरीका था. लेकिन हमे भा-ऊसाहेबका हुकूम् नहिथा. बळवंतराव मेहेंदळेकूं जमीयत लेकर जाने-का हुकूम् कियाथा; वो जमीयूत लेके खाली तमासा देखतेथे, जन-कोजीकी जवामर्दीका मै क्या बयान करूं? मेरेकूं जींद नजर आ-ताथा. चलो आब भाऊसाहेबको फते मंदकी खबर पोहोचावेंगे. ओ निहायूत खुष् होंगे. मगर ये कौन आतेहै मै समजताहू रावसाहेब है. ( उभयतां सलाम करतात. )

( विश्वासराव प्रवेश करितो. )

**विश्वास०**—जनकोजी शिंदे अजून रणमैदानांतून आले नाहींत का? भाऊसाहेब इकडे यावयास निघाले आहेत. एकदा जनकोजीला केव्हा भेटेन असें त्यांस झालें आहे. शिंदे मोठे बाणीदार प्रतिज्ञा खरी करणारे केवळ "भीष्माचार्य." कुंजपुऱ्यावर निशाण चढवीन तर पुनः तोंड दाखवीन, ही प्रतिज्ञा खरी केली. आज तरी काय फत्ते झाली तर भाऊसाहेबांला येऊन मुजरा करीन, नाहीं तर तोंड दाखविणार नाहीं, अशी सकाळीं भयंकर प्रतिज्ञा करून गेले, पण कौल सच्चा केला. वारे वा जनकोजी शिंदे.

**मल्हार०**—वारे माझा मल्हारी म्हाळसाकांत, दुराणीचा नुसता भंडारा उडवून दिला. परमेश्वरानें आज मोठी खैर केली, नाहीं तर आज या केंसाला बट्टा लागला असतां. भाऊसाहेबांचा हुकूम, सुभेदार, तुह्मी स्वतः जाऊं नका, पोराला समजावून परत आणा. पोराच्या अंगांत तर ही गुर्मी कीं, उष्ट्या झुंजाला शिवणार नाहीं. मला कोणी साफ मदत करूं नये. मग गुप्तपणें सात हजार लोक संताजी वाघमाऱ्याबरोबर दिले, पण त्या बहादराला कोणाचीच जरूर नाहीं. त्यानें दुराणीला असा पिटून मागें लाविला कीं, पुनः कधीं वर तोंड करील कीं नाहीं. पहिल्यानें आमच्या मराठे गड्यांनीं थोडासा कच खाल्ला, लागले मागें फिरायाला. तेव्हां मी घोड्यावरचा गाशा दिला जमिनीवर टाकून, आणि बसलों त्याच्यावर. वाघमाऱ्याला सांगितलें आह्मांला रणमैदानांत सोडून जर जायचें असेल, तर खुशाल जा. दुराण्यांना आमचें डोकें कापून नेऊं द्या. आह्मी कांहीं साफ हलणार नाहीं, तेव्हां आमचे लोक फिरले. ही गोष्ट श्रीमंतांच्या कानापावेतों गेली नाहीं ह्मणजे बरें, नाहीं तर तुह्मी कां गेलां असा दोष लावतील, पण हे भाऊसाहेब आले वाटतें.

**भाऊसा०**—अहारे हिंमतबहादर जनकोजी शिंदे! खरोखर तूं केवळ महाराष्ट्र सिंहछत्रपति शिवाजीमहाराजांचा अवतारच आहेस. या भरतभूमीला झालेले अविंद्यांचें ओझें खात्रीनें हलकें करशील. सकाळीं घोर प्रतिज्ञा करून गेलास खरा, पण दुराणीला पुरा हात दाख-

वून विजयश्रींचीं निशाणें फडकवीत येत आहेस, हें पाहून महासागर जसा पौर्णिमेच्या चंद्राला पाहून उचंबळून जातो, तसें या सदाशिव-रावाचें अंतःकरण प्रेमाच्या तुफान लाटांनीं उचंबळून गेलें आहे. डंके, नगारखाने, भेरी, सैदोन, शिंगें यांचा आवाज साऱ्या रणमैदानांत घुमून राहिला आहे. पण हा पहा माझा शूर पठ्ठा मराठा गडी—आम्हा महाराष्ट्रीयांचा केवळ प्राण—पेशवे बहादरांचा केवळ कलिजा, जनकोजी शिंदे आला ( **जनकोजी** व **भाऊसाहेब** भेटतात, **जनकोजी भाऊसाहेबांच्या** व **सुभेदारांच्या** पायां पडतो. ) जनकोजी, कंठ प्रेमानें दाटून, नेत्रांतून पाण्याचे लोट चालले आहेत. कांहीं बोलवत नाहीं. वीरमातेच्या पोटीं जन्म घेऊन सार्थक केलेंत. तुमच्या शौर्याची स्तुति सगळे महाराष्ट्रजन गातील. तुम्हीं आपलें नांव या भरतभूमीवर अमर केलेंत, शाबास आहे तुमची.

**जनको०**—ही सगळी नानासाहेब, दादासाहेब, आपण, रावसाहेब, सुभेदारसाहेब यांच्या पायांची कृपा आहे. आह्मी शिंदे ह्मणजे सरकारचे बारगीर, सरकारचा जोडा काखेंत घ्यायचें आमचें काम, आम्हांला सरकारांनीं आपलें म्हटलें, म्हणून आम्हीं या दशेला आलों. रात्र पडली यामुळें नाइलाज झाला, नाहीं तर सरकारच्या पायापाशीं दुराणीला कान धरून जिवंत आणिला असता. नजीबखान, सुजाउद्दवला, यांचीं शिरें पायापाशीं घेऊन आलों असतों. ( **बळवंतरावाकडे** नजर जाते. ) पण महाराज, ऐन आणीबाणीच्या प्रसंगीं मला कोणीं पाठपुरावा केला नाहीं. बळवंतराव, आम्ही शिंदे म्हणजे सरकारच्या सेवेला चोर नाहींं. आजपावेतों नेकीनें नौकरी केली म्हणून परमेश्वरानें आज आम्हांस विजयी केलें. तुम्हीं जर मदत केली असती, तर आज गिलच्या जिवंत राहिला असता का? पण तुमची इच्छा शिंद्याची बदनामी व्हावी, त्याला मुसलमानांनीं कैद करावें आणि मग आपण हर हर महादेव करून शत्रूंचा धोषा उडवून द्यावा.

**भाऊसा०**—काय? मेहेंदळे तुमच्या पाठीवर धांवले नाहींत? स्वस्थ तमाशा पहात उभे राहिले? कोण दुष्ट बुद्धि ही! मेहेंदळे-

यांच्या नावाला ही कोण बदनामी! अहो, तुम्हीं कर्नाटकांत एवढाले परा्क्रम केलेत, एवढा नांवलौकिक मिळविलांत, आणि आज तुमचे हात तलवार धरण्यास लुले पडले!! जनकोजीसारखा जोडीदार असून, आज लढाईंत तुम्हीं कच खाल्लीत, ही गोष्ट अत्यंत निंद्य केलीत. आजचे आज दुराणी खामखा नाहींसा करून दिग्विजयाचा झेंडा उभारून नानासाहेबांचे पायाचें दर्शन घेण्यास दक्षिणेंत गेलों असतों. पण तुम्हीं आयत्या वेळीं दगा दिलात. माझा हुकूम तोडलात. सुभेदारांना माझी आज्ञा नव्हती; पण तुम्हांला हुजुरातीची फौज घेऊन शिंद्यास मदत करा, असें सांगितलें असून तुम्ही तमाशा पहात स्वस्थ बसलांत? बस् बस् कमाल आहे तुमच्या अकलेची!!

**मल्हार**०—जनकोजीची जर बळवंतरावानें कुमक केली असती, तर आज पूर्ण विजयी झालों असतों. आमच्यावर जेव्हां तेव्हां गुरकावतात? आम्हांला दरबार सुद्धां बंद झाला होता. बाकी आम्ही काय? चाकर माणूस. दरबारांत आम्हांला दखल व्हावी कशाला? बोलावलें तर आले, नाहीं तर बसले स्वस्थ. पण आजची मसलत मेहेंदळ्यांनीं बुडवली. हुजुरातीची पंचवीस हजार फौज घेऊन जनकोजी कसा मरतो, ह्याचा तमाशा पहात उभे राहिलांत? आज पोराला पाठबळ असतें तर केवढा आनंदीआनंद होऊन गेला असता? आज तुमची केवढी वाहवा झाली असती? बस्, या चुकीचा जाब तुम्हीं दिलाच पाहिजे.

**बळवंत**०—चूक होऊं नये पण झाली, क्षमा करणार सरकार समर्थ आहेत. मेहेंदळे यांच्या नांवाला आज जी कालिमा लागली, ती धुवून टाकून आजचे आज हुजुरात बरोबर घेऊन श्रीमंतांच्या नांवाचा यशोदुंदुभी सर्व हिंदुस्थानांत गाजवीन, तर फिरून तोंड दाखवीन, नाहीं तर फौजेसुद्धां तिकडेच गारत होईन. श्रीमंतांनीं एक वेळ जरीपटका ह्या मेहेंदळ्यांच्या सुपूर्द करावा. गिलचे ह्मणजे कोणी शेर नाहींत. आतांचे आतां गिलच्यांना इशारा देतों, कीं मराठे पुनः निकराचे सामन्यास रणमैदानांत खडे आहेत.

असेल तुमच्या छातींत धमक तर या अंगावर. हा गणपतराव मेहेंदळ्याचा बच्च्या अपशय घेऊन येणार नाहीं. श्रीमंतांची खातरी असावी. शंभर वर्षांत केव्हां तरी मरण आहेच, मग या चाललेल्या युद्धाच्या समारंभांत तरी कां मुक्तता करून घेऊं नये ? अप्पाराव अजून लहान आहे. त्याचा श्रीमंतांनीं प्रतिपाळ करावा. आम्हास आतां जाण्याची अज्ञा व्हावी. शिंदे होळकर यांची आमच्यावर खप्पा मर्जी झाली आहे, तेव्हां त्यांच्याकडून आम्हाला आतां मदत होणारच नाहीं.

**जनको०**—हां मेहेंदळे ! शिंदे होळकरांचें हें ब्रीद नाहीं. असा नीचपणा आमचे हातून होणार नाहीं. तुमच्या पाठीवर शिंदे होळकर तुमच्या सख्या भावाप्रमाणें गिलच्यावर रणमैदानांत कसे तुटून पडतात, यांची प्रचीत हीच पहा. तुमचीं आमचीं लाडकीं भांडणें श्रीमंताच्या पायापाशीं. पण जेथें आमच्या महाराष्ट्र देशाची इजत जाण्याचा प्रसंग, तेथें तुम्ही आम्ही जिवाला जीव देणारे दोस्त. दुराणीनें आज खस्त खाल्ली आहे. इतक्यावर चढाव करून उद्या आलाच, तर लाथेनें तुडवून टाकूं. शिपाईगिरीची कमाल करूं. चिरंजीवाची निरवानिरव करण्याचें कारण नाहीं. श्रीमंतांच्या अन्नाचा पिंड, श्रीमंतासाठीं लढाईत धरणीवर पडला, तर त्यासारखी मुक्ति नाहीं. स्वामीकार्यीं देहाचें सार्थक्य झालें तर आपल्यास फारच आनंद आहे. सरकारांनीं शिंदे होळकराला यांचेबरोबर जाण्याची परवानगी द्यावी.

**मल्हार०**—बळवंतराव, तुम्ही यत्किंचित् उदास होऊं नका. संतापाच्या भरांत एकमेकाला मनुष्य तटून बोलतें—आम्हांला त्याचा मुळींच राग नाहीं. सकाळीं मला तुम्ही " वेजीं उतरलेलें मोतीं " म्हटलेंत. त्यामुळें जनकोजीचें माथें फिरून जाऊन त्या आवेशांत त्यानें भयंकर प्रतिज्ञा केली, आणि गिलच्यांस अशी तंबी दिली कीं, आतां तो महिना पंधरा दिवस वर मुंडी करणार नाहीं. माझ्या मतें आज जनकोजीला यशप्राप्ति होण्याला सर्वप्रकारें मेहेंदळ्यांचे वाग्बाण कारणीभूत झाले. त्यांना आम्ही एकदिलानें म्हटून म-

दृत करणें हें आमचें कर्तव्य आहे. मेहेंदळ्यांची तलवार फत्ते झाली, तर तें यश आमचेंच आहे. आह्मांला आणि मेहेंदळ्यांला मराठ्यां-च्या गादीचा अभिमान सारखाच असला पाहिजे.

**भाऊसा०**—तुम्हां दोघातिघांची दिलजमाई झाली, ही मोठी आनंदाची गोष्ट आहे. सुभेदारसाहेब, मनांत सोंच ठेवूं नका. जसा तुम्हांला तुमचा मालीराव तसाच हा बळवंतराव समजा. आज-पावेतों कमजास्त झालेल्या बेजाबाची माफ करून समशेरबहादर, इब्राहीमखान, आणि तुम्ही दोघे शत्रूंवर एकदम दौड करून ते बेशिस्त आहेत तोच त्यांचा पिसाब पायखाना बंद करून त्यांना लुटून फस्त करा. मागाहून मी चढ्या घोड्यानिशीं फौज घेऊन दौडत दौडत येतों. तलवार चालवून शिंदे दत्ताजी, बुंदेले गोविंदराव आणि दिवाण महिपतराव, यांच्या बदली अहमदशाह अबदली, नबाब सुजाउद्दवला, आणि नजीबखान रोहिला, यांच्या गर्दनी छाटतों. या वेळीं दुष्मन खस्त खाल्ल्यानें गाफल असतील. आतांचे आतां कूच करण्याचा नगारा करून, दरोबस्त फौजेस खंदकपार होण्याचा इशारा करा, म्हणजे प्रातःकाल झाला नाहीं तोंच त्यांना घेरा पडला पाहिजे. नाहीं तर युद्धास तोंड तरी लागलें पाहिजे. जनकोजी तुम्ही थोडी विश्रांति घ्या. फौजेची कडेकोट तयारी झाल्या-बरोबर आपल्यास सूचना पाठवूं. ( सर्व जातात. )

---

## प्रवेश ५ वा.

### स्थळ—बळवंतराव मेहेंदळे यांचा गोट.

( **लक्ष्मीबाई** व **आप्पाराव** प्रवेश करितात. )

**लक्ष्मीबाई**—आप्पाराव, अजून घरीं येणें झालें नाहीं. काल-पासून माझ्या मनाला सारखी हुरहुर वाटत आहे. आज सकाळपासून अमंगलकारक चिन्हें होत आहेत. उजवा डोळा लवतो आहे. सकाळीं तें मेलें दिवाभीत तंबूचे कनातीवर बसून घु घु करून सारखें ओर-डत होतें. कालपासून दोन वेळ जळत दिवा हातांतून पडला. खांबा-

वर हात आपटून बांगड्या वाढल्या. अशा एक कीं दोन गोष्टी म-नाला रुखरुख लावण्यासारख्या घडून आल्या ह्मणून सांगूं? एकदां या मेल्या लढाइचा शेवट कधीं लागतो आहे असें मला झालें आहे. आजपावेतों कर्नाटकांत अनेक वेळां लढाया मारल्या आहेत. अप-यश कसें तें माहीत नाहीं. त्यामुळें नानासाहेबांनीं खुष होऊन मेहेंद-ळ्यांचा सरंजाम वाढविला. एकदां स्वतः जाऊन दुराणीशीं सामना करीन, त्याला या मेहेंदळ्याचा पराक्रम कसा आहे तो दाखवीन, असें वारंवार म्हणावयाचें होतें. पण, कायरे आप्पाराव, आजच्या लढाईची खबर काय आहेरे?

**आप्पाराव**—आजच्या लढाइचा शेवट असा झाला कीं, जन-कोजी शिंद्यांनीं मोठें नांव केलें आहे, असें रावसाहेब बोलतांना मीं ऐकिलें. भाऊसाहेबांनीं बाबाला त्यांच्या मदतीला हुजुरातची पं-चवीस हजार फौज देऊन पाठविलें असून, त्यांनीं कांहीं शिं-द्याला मदत केली नाहीं. भाऊसाहेबांचा हुकूम तोडला. नाहीं तर आजच लढाई आटोपली असती. असा ठपका बाबावर आलेला आहे. खरोखरच आई मला वाटतें आज बाबाकडून मोठी चूक झाली.

**लक्ष्मी०**—तरी माझें नेहमीं सांगणें असें कीं, तुह्मी त्या शिंदे-होळकरांना पाण्यांत पहात जाऊं नका. तुमच्या या आपसाआपसात भांडण्याचा परिणाम धड होणार नाहीं. पंचवीस हजार फौज घेऊन तेथें तमाशा का पहायला जाणें झालें होतें? जनकोजी ऐवढेंसें मूल असून आज ज्याच्या त्याच्या तोंडीं शिंद्यांचें घराणेंच तसें—जनको-जी तसाच तलवार बहादर आहे—त्याला साम्यता अभिमन्यूची, असे उद्गार निघत आहेत. आमचें मेहेंदळ्यांचें घराणें अगदीं नामर्द कां ठरलें?

**बळवंत०**—( जोरानें प्रवेश करून ) नामर्द आहे कीं, हिम्मत-बहादर आहे याचा अनुभव एका तासांत समजेल. पंचवीस हज्जार फौज घेऊन तमाशा पहायचें झालें. बायकांनीं सुद्धां अपमान करावा आं! धिक् धिक् जिणें! भाऊसाहेबासारखा मोहरा आणून

इरेस घातला तो कांहीं उगाच नाहीं, समजलीस. ब्राह्मणपदपाद-शाहीची टोलेजंग इमारत दिल्लीस उभारून हा मेहेंदळे बहाद्दर येथें पेशव्यांची दिवाणगिरी करणार. प्रत्येक मनुष्याला थोडीशी तरी महत्वकांक्षा, इर्षा आणि पाणीदारपणा हा असतोच. हे शिंदे होळकर म्हणजे अगदीं नाकचे बाल बनले आहेत. यांच्यावर ताण करून यांची गुर्मी जिरवून टाकतों. बस! तुमची आमची हीच भेट. परमेश्वरानें फत्ते केली, तर या मेहेंदळ्याचें नांव जगांत होईल. नाहीं तर हें तोंड फिरून दाखविणार नाहीं. आणि हा बायकांकडून झालेला अपमान—

**लक्ष्मी०**—अपमान? (मोठ्या रागानें) मी आज असें समजतें कीं, जनकोजीला विजयश्रीनें माळ घातली आणि आपलें कपाळीं अपेशाचें खापर फुटलें. "रजपूतांच्या बायका ज्या वीरांनीं रणांगणांत पाठ दाखविली, त्यांचीं तोंडें पहात नाहींत. प्रत्यक्ष नवरा असला, आणि युद्धापासून पराङ्मुख झाला तर त्याचें सुद्धां मुखावलोकन करण्याची त्यांना शरम वाटते. त्यांना वीरपत्नी, वीरमाता असें म्हणून घेण्याची फार हौस वाटते." असें नेहमीं म्हणायचें होत असेना? असें असून आज हा केवढा कलंक मेहेंदळ्यांचे नांवाला. याची मला फार शरम वाटते. असेंच रणां-गणांत परत जाणें झालें असतें तर, त्याचें मला वाईट वाटलें नसतें. यश संपादून परत येणें झालें म्हणजे पंचारती घेऊन मार्ग-प्रतिक्षा करीत घरांत उभी राहतें. 'अपेशी नवऱ्याची बायको' असें ज्यांच्या त्यांच्या तोंडांतून ऐकून घेण्याला हा जीव एक घटका भर सुद्धां जीवंत ठेवणार नाही. अगोदर शिंदे होळकरांचें नाव घ्यावयाचें नव्हतें, त्यांच्या वाटेला जावयाचें नव्हतें, वाघाला डवचून जागें करावें आणि मग पळ काढावा. बस! आतां शिंदे होळकरांच्यावर ताण झाली पाहिजे. नाहीतर यावज्जीव आपल्या-वरचा शब्द जाणार नाहीं. भाऊसाहेबांचा हुकूम तोडला, पेश-व्याशीं शिरजोर झाले, असें लोक म्हणूं लागले आहेत. याच्या-पेक्षां जरी मजवरती रागवायाचें झालें, तरी मी भिणार नाहीं. मार्से

म्हणणें खरें आहे कीं, खोटें आहे याबद्दल इकडचें मनच साक्ष देत असेल. पंचवीस हजार फौज घेऊन स्वस्थ उमे राहिलांत, त्याचें कांहींच कां वाटत नाहीं ?

**बळवंत०**—बस्स ! झाली गोष्ट झाली. मी केवळ शेवटची निरवानिरव करण्याकरितां आलों आहे. कदाचित् मला समरांत मृत्यू आला—

**लक्ष्मी०**—काय ' मृत्यु ' अशीं अभद्र अक्षरें या मेहेंदळ्यांच्या घरांतील वीरांच्या तोंडांतून ? आई अंबाबाई असा प्रसंग आणणार नाहीं. आणि आलाच तर त्याची आह्मां विरांना इतकी परवा कशाला व्हावी ? समरांगणांत मृत्यु येणें, हेंच क्षात्रधर्माला भूषण—त्याला न भिणें हेंच वीरांचें ब्रीद. मोठमोठे कर्णासारखे वीर समरभूमीवर पतन पावले. त्यांना कोणी जगांत हंसत नाहीं. ईश्वरानें तसा प्रसंग आणूं नये. आणि जर आणिला तर ही लक्ष्मीबाई सहगमन करून आपल्याबरोबर जन्मजन्मांतरीची सहचारिणी आहेच, असें समजा. मृत्यु ह्मणजे क्षुल्लक गोष्ट आहे असें समजतें. आत्मा अमर आहे. शरीर माती आहे. एक वस्त्र टाकून आपण दुसरें अंगावर घेतों, तद्वतच ह्या जन्मीं नाहीं तर पुढील जन्मीं आपण सुख भोगूं. आप्पारावाची काळजी नको. परमेश्वर त्याचे पाठीवर आहे. ' अपेशी बापाचा मुलगा ' असें म्हणवून घेण्यापेक्षां परमेश्वरानें त्याला नाहींसा केला तरी हरकत नाहीं. काय आज जिकडेतिकडे मेहेंदळ्यांच्या नांवानें सगळें लष्कर खडे फोडीत आहे. व्यर्थ ! व्यर्थ जिणें ! !

**बळवंत०**—जितके जितके वर्मी घाय मारशील तितका तितका माझा निश्चय ठाम होत चालला आहे. तुझा एकेक शब्द बिनमोल आहे. माझ्या अंगांत स्फुरण चढत आहे. धन्य मी कीं, मजला अशी शूर, मानी, आणि पतिव्रता स्त्री मिळाली. बरें येतों आतां. आप्पाराव ( त्याला कुरवाळून ) येतों आं बाळ ?

**आप्पा०**—( रडत रडत ) आई, तुह्मी दोघे एकमेकांशीं भांडतां. मला आजी म्हणत होती कीं, आप्पाराव तूं लहान आहेस, तूं लढाईवर जाऊं नको. त्या वेळीं, तुह्मीं दोघांनीं मला बळेंनें येथें आ-

णिलें. आणि तूं आत। बाचावर रागावतेस व तो तुझ्यावर रागावतो. बाबा, तूं अशा रागानें जाऊं नकोस. घटकाभर विश्रांति घे. मी तुझ्याबरोबर लढाईला येतों. आपण दोघे त्या दुराणीला कान पक· डून येथें धरून आणूं.

**लक्ष्मी**०—मी तरी विश्रांति घेण्यास नको कां ह्मणतें ? मनुष्य रागांत असलें म्हणजे खऱ्या गोष्टी बोलून टाकितें. ( हाताला धरून बसवूं लागते. ) विडा नाहीं कां घ्यावयाचा ?

**बळवंत**०—साफ घेणार नाहीं. जय आला तर फिरून तोंड दा- खवीन. नाहींतर तुमची आमची भेट स्वर्गी. ( जोरानें जातो. )

**लक्ष्मी**०—माझा फारच राग आला असें दिसतें. आप्पाराव, मी यांत गैर काय बरें बोललें ? यावेळीं इकडून जर शिंद्यांना मदत झाली असती, तर आज सुदीन उगवला असता. सगळ्या दक्षिणेंत मेहेंदळ्यांचे नांवाचा गजर झाला असता. कोणतीही गोष्ट वेळेवर झाली, तर त्यांत गोडी. आतां घडी विसकडली. आतां जरी आपली सरशी झाली, तरी विशेष वाहवा होणार नाहीं. झाली गोष्ट झाली. चला आपण पार्वतीबाईकडेस झालेली हकीगत जा- ऊन सांगूं. ( उभयतां जातात. )

---

## प्रवेश ६ वा.

### स्थळ--पानपतनजीकची टेंकडी.

( टेंकडीवर **भाऊसाहेब** व **विश्वासराव** बसले आहेत. **भाऊसाहेबांचे** हातांत दुरबीन आहे. )

**भाऊसा**०—दुराणी महा वस्ताद ? त्याला वाटलें कीं, आतां हे मराठे जय मिळाल्यामुळें स्वस्थ आनंदांत पडले असतील, तोंच यां- च्यावर चालून जावें. आमच्याप्रमाणें त्यानेंही चालून येण्याचा बेत केला. ( दुरबिनींतून पहातो. ) अहा हा हा !! धन्य या आर्यभूमी- ची ! एकापरीस एक भीमार्जुनासारखे महावीर, दर रिकिबीस तल- वार गाजविणारे, अंगांत रणमाद चढलेला, घुग्या, बखतारे, चिलखतें,

टोप, चिन्या, बिर्जे, अंगांत चढवून, हातांत पट्टे, गुरगुज फिरंगाणा, परीघ, पट्टीश, फरश, बरची, बंदुक घेऊन रणांगणांत जाण्याचा शृंगार केला आहे. विश्वासराव, प्राणाला तृणासमान मानणारे, बेछुट नव्या उमेदीच्या माझ्या हजारों हजार मराठे बहादुरानीं आपआपल्या घोड्यास नटनागर, जरीबादली पाखरा, पायांत तोडर घालून घोड्यांस मानेवर थोपटून स्फुरण आणिलें आहे. धन्य धन्य यांच्या वीर माता ! ! अंबारीला हौद्यांना हौदे घांसून मोत्यांच्या झालरी, फाटून जात आहेत. जंबूरे, रेकले, जेजाला आणखी गारभांडी सुमारें दीड हजार आवाज बरोबर आहे. बाणांच्या कैच्या उंटांवर घालून सर्व मराठे वीर सिंहनादाप्रमाणें भयंकर गर्जना करीत आहेत.

( दुरबीन **विश्वासरावाचे** हातीं देतो.)

**विश्वास०**--बळवंतराव, हुजुरातची पागा घेऊन फौजेच्या मध्यभागीं उभे आहेत. त्यांच्या डाव्या बाजूस विठ्ठल शिवदेव विंचूरकर, दामाजी गायकवाड, इब्राइमखान गारदी, उजवे बाजूस यशवंतराव पवार, समशेरबहाद्दर, सुभेदार मल्हारराव होळकर, आणि जनकोजी शिंदे उभे आहेत. फरांसीस लोकांजवळ तरबेज झालेल्या इब्राहिमखान गारदी याचे लोक, मस्तकांवर ढाला घेऊन हातांत नग्न तलवारी घेऊन बडे हुशारीनें हुम्मस न खातां मांडीस मांडी देऊन घोडा राऊत मिसळणार नाहीं अशा बेतानें निशाणाचे फरारे सोडून उभे राहिले आहेत. दुराणीचा खासा हौदा दिसत नाहीं. बाकी नजीबखान, सुजाउद्दवला, बडे वजीर शहावलीखान, दुंदेखान, लंघडे पठाण, बरखोरदारखान, ही मंडळी आली आहेत. त्यांनीं आपल्या फौजा, अंतरा अंतरानें उभ्या केल्या आहेत. काका, दुराणी लोक अंगांवर चालून आले. मराठयांनीं तोफेला सरबत्ती दिली. (आवाज होतो.)

**भाऊसा०**—( दुरबीन हातांत घेऊन ) दोन्ही फौजेंत धुंदःकार होऊन, कांहींच दिसत नाहीं. फक्त ब्रह्मांड फुटून जाईल अशा प्रचंड गर्जना ऐकूं येत आहेत. हा, आतां वाऱ्याच्या सोसाटयासरसा धुराचा लोट नाहींसा झाला. शाबास ! वीरांनो शाबास ! तोफेचे गोळे धुंद दणाद्दण जाऊन दुराणीच्या छाताडांत आदळत आहेत. पर्जन्यवृष्टीप्र-

माणें गोळ्यांचा भडिमार चालला आहे. सों सों आवाज करीत बाण सणासण्ण जात आहेत. पट्टयांचे आणि खांड्यांचे खणखणाट चाल-लेले आहेत. एकच धुमाळी माजलेली आहे. नौबदी, डंका, भेरी, सारख्या झणझणा झडून राहिल्या आहेत. हजारों तोफा सुटत आहेत, लाखों तलवारी चमकताहेत. नुसती लाही लाही फुटत आहे. सतीसारखे पैजेचे विडे उचलून, घाव चुकवून, वाघासारखे गुरकावून, किरण सा-धून एक एक झांप आमचे महाराष्ट्र भूमींतील पयःपान केलेले मराठे वीर दुराणीवर टाकीत आहेत, दुराणीची पिछेहाट झाली. मोहरा मार्गे फिरविला. कत्तल, कत्तल, कत्तल, मराठ्यांनीं कत्तल चालविली. मेहेंदळ्यांनीं फत्तेमंदी मिळविली. पळाले रोहिले.

( बातमीदार प्रवेश करितो. )

काय खबर आहे ?

**बातमीदार**—नजीबखान आपली फौज घेऊन प्रथम चाल करून आला. पण मेहेंदळे सरदारांनीं अशा सपाट्यानें हुजुरातचे लोकांनिशीं हल्ला केला कीं नजीबखानाच्या फौजेनें मार्गेच पाय काढला. मग आमचे मराठे गड्यांना अवसान चढलें. सगळे रोहिले कापून काढले. नजीबाजवळ फक्त पन्नास स्वार राहिला, पण आतां त्याच्या मदतीला, पुनः पंचवीस हजारांची भरती येऊन मिळाली आहे. अजूनपावेतों श्रीमंतांची फत्ते आहे. ( मोत्यांचें पेंडें बक्षीस देतात. ) ( जातो. )

**भाऊसा०**—( दुरबिनींत पाहून ) दुराणी लोक पुन्हां कमर-ग्यांत शिरले, आतां तिरंदाजी बंद पडली. जनकोजी शिंदे, सुभे-दारसाहेब, समशेरबहाद्दर, इब्राहिमखान, यांनीं दुष्मनांची फौज चौफेर घेरली आहे. लढाई हातघाईवर आली. भाला, बिचवे, जमदाडा, वाघनखें, यांचे नुसते चपेटे चालले आहेत. एकमेकांच्या गळ्याला मिठ्या मारून पुढचे पाय पुढें टाकीत आहेत. हत्तीवर हत्ती पर्वता-प्रमाणें कोसळत आहेत. मल्लयुद्धाची झोडधरणी चालली आहे. या युद्धांत वांचून पुनः दक्षिणेंत जाऊन संसार करावा, अशी कोणी आशा केली नाहीं. कितिकांची शरीरें या रंवदळींत चिरडून गेलीं

आहेत, कित्येकांचे हातपाय तुटून नुसते कोथळे रणांत पडले आहेत, कित्येक वीर रक्तबंबाळ होऊन भयंकर दिमत आहेत, कोणी विष्णु-लोकास, कोणी सत्यलोकास चालले आहेत, कोणी कैलासास चालले आहेत, या आर्यभूलिंगास रक्ताचा अभिषेक चालला आहे, आर्यमित्रांची शिरें, हींच कमलपुष्पें, या भूलिंगास अर्पण होत आहेत.

( बातमीदार प्रवेश करितो. )

**बातमीदार**—दुराणीचीं निशाणें खंदकाच्या अगदीं धमाम्यापाशीं येऊन भिडलीं आहेत. मेहेंदळ्यांनीं दुराणीचें तोंड मोठ्या निकरानें थोपवून धरिलें आहे. शिंदे होळकरांनीं आपले घोडे मध्यें घालून कापाकापी चालविली आहे. असें झालें नसतें, तर दुराणी आपल्या गोटांत शिरला असता. त्याला वरचेवर कुमक येऊन मिळत आहे. तेव्हां जनकोजी शिंद्यांनीं खासा स्वारींनीं एकदम बाहेर पडावें, ह्मणून विनंति केली आहे. परी घोडीवर, आणि दिलपाक घोड्यावर, जीन चढवून उभीं केलीं आहेत.

**भाऊसा०**—( खालीं उडी टाकून ) ठीक आहे. माझे दोन्ही हातांत दोन पट्टे चढवायला आण. छत्रपति महाराजांच्या पायाचें स्मरण करून भयंकर गर्जना करून घोडा घालतों. सुजाउद्दवला; नजीबखान, खासे खासे बादशहाजादे, यांना या खुदा, या रहिमान, करीत परत लावतो. विश्वासराव, तुह्मी येथें राहून कबिलें संभाळावे. आह्मीं आतां आलोंच म्हणून समजा. ( जातो. )

**विश्वास०**—( दुर्बिनींत पाहून ) काकानें वाऱ्यासारखा घोडा फेंकला, भिडले जाऊन खंदकाला. घोड्याखालीं उडी टाकली. दोन्हीं हातांत दोन पट्टे चढवून जिवाची तमा न धरतां धिटाईनें फौजेवर चालून गेले. कत्तल करीत चालले आहेत. जनकोजी शिंदे, सुभेदारसाहेब, दामाजी गायकवाड, सदाशिवपंत पुरंधरे, महिपतराव चिटणीस, विंचूरकर, या सर्वांनीं घोड्याखालीं उड्या टाकून पायउतारा झाले आहेत, सर्वांनीं हातांत पट्टे चढविले आहेत. बेलाशक हैदोस करीत चालले आहेत. दुराणीचीं फौज दाही दिशा उधळून गेली. अंगावर आले त्यांचीं कत्तल उडाली. मराठे लोक परतले.

( जनकोजी शिंदा प्रवेश करितो. )

**जनको०**–धन्य आहे या भाऊसाहेबांच्या वीरश्रीची !, सुरगण विमानांत बसून, मजा पहात असतील. वीरांच्या मर्दुमकीचा कळस झाला. पण अखेर गोड झाला नाहीं. मेहेंदळे रणांगणांत जखमी होऊन पडतांच, एका दुराण्यानें छातीवर पाय देऊन, गळ्याची घाटी दाबून गळा कापला. तों त्यास खंडेराव निंबाळकरानें लाथ मारून खालीं पाडला. तों दुसरे दहा रोहिले, मेहेंदळ्याच्या मुड्यावर शिर नेण्यासाठीं पालथे पडले. त्या वेळीं भयंकर कापाकापी होऊन अखेर भाऊसाहेबांनीं मोठा पराक्रम करून शंभर रोहिल्यांचीं दोन पट्यांनीं खांडोळीं करून मेहेंदळ्याचें शिर उचलून हृदयाशीं घट्ट धरलें. मेहेंदळे यांनीं शिपाईगिरीची शर्त केली. खरे स्वामीभक्त, आज कामास आले. धन्य त्यांचे माता पिता, कीं ज्या ब्राह्मणवंशांत असा पुत्र उदयास आला. मोठा अभिमानी ! मोठा वीरश्रीचा ! आजच्या लढाईत दुराणीची खुमखुम जिरली. पुनः तोंड करील कीं नाहीं. खासा खासा मोहरा एका ताटांत जेवणारा उभयपक्षांकडील मिळून साडे सातशें कामास आला. उभयपक्षांकडील माणूस पस्तीस हज्जार ठार पडलें. बारा हज्जार घोडा मोकळा फिरतो आहे. पंचाहत्तर हत्ती ठार होऊन पडले. दोन हज्जार उंट जायबंदी झाला. लढणारा पंधराशें ब्राम्हण आज ठार झाला. उभयपक्षांकडील घोडेस्वार, तोफखाना,पायदळ यांची बरीच खराबी झाली आहे. पेशवेबहादर यांचे कडील थोर थोर सरदार, मानकरी, एककांडे, धारकरी आणि हुजुरातींतील कित्येक लोक पडले. यांची नांवनिशी आणि दुराणीकडील नांवनिशी लिहिली. तर या कलियुगांत एक भारतच होईल.

**( भाऊसाहेब, होळकर, समशेरबहादर, इब्राहिमखान,** शिपाई वगैरे प्रवेश करितात. )

**भाउ०**—( मेहेंदळ्यांचें शिर हातीं घेऊन ) बळवंतराव, आह्मां सर्वांस सोडून गेलास ! एक घटकेच्या पूर्वीं माझ्यापुढें तलवार गाजवीत होतास. सर्वांच्या डोळ्यांदेखत एकाएकीं छातींत गोळी लागून खालीं पडलास. शेंकडों दुष्मन तुझ्या अंगावर कोसळले. पण अखेर

त्यांच्या हातीं परमेश्वरानें शिर लागूं दिलें नाहीं. ही मोठी खैर झाली. पेशवाई दरबारांतला एक अमोलिक मुत्सद्दी, शिंदे होळकरांशीं, ईर्षेनें स्पर्धा बाळगणारा गेला! मोठा थट्टेबाज, पुरा कारकून, लढणारा बाका, जिवाला जीव देणारा, मी जर रागावलों, तर कधीं मान वर केली नाहीं. आतां याचे कुटुंबास आणि त्या लहान पोरास ही भयंकर दुःखाची वार्ता समजल्यावर ते आक्रोश करून प्राण सोडतील.

**मल्हार०**—सरकार, मेहेंदळ्यांचें कुटुंब आणि मुलगा आले आहेत. ( भाऊसाहेब शिर भूमीला ठेवून उभा राहतो. )

**लक्ष्मी०**—काल मला ह्मणायचें झालें कीं, परमेश्वरानें यश दिलें तर उत्तम, नाहीं तर तुमची आमची भेट स्वर्गी. अखेर आह्मांला सोडून गेलांत. माझें अहेवपण नाहींसें झालें. ( शिर मांडीवर घेऊन ) मजवर कां इतके रुसलां! लढाईला जातांना हातचा विडा सुद्धां घेतला नाहींत. आम्ही तुमचा काय अपराध केला? आह्माबरोबर भाषण करून गेल्यास एक प्रहर लोटला नाहीं. असें ईश्वरानें आम्हांस निर्वाण कां दाखविलें? सर्व संपत्तीची आणि आमची आस्था सोडून गेलात! पण मी बरोबर आल्याशिवाय रहाणार नाहीं. लढाईंत शिंद्यांना मदत केली नाहीं ह्मणून भाऊसाहेब फार रागावले आहेत, शिंदे, होळकर यांना फार वाईट वाटत आहे, जय घेऊन आलों तरच शिंदे, होळकर आणि भाऊसाहेब यांना तोंड दाखवीन, नाहीं तर दाखविणार नाहीं असें रागानें बोलणें झालें. भाऊसाहेब, शिंदे, होळकर हे कांहीं परकी नव्हते. रागावले म्हणून काय झालें? त्यांच्यावर रुसून असे एकटे कसे चाललांत? आतां त्या सर्वांच्या डोळ्याला धारा लागल्या आहेत. पाठचा भाऊ गेल्याप्रमाणें सर्वांना दुःखाचा उमाळा आला आहे. पण स्वामिकार्यी देह पडला हें ऐकून मागें आजरामर कीर्ति राहील. आज या मेहेंदळ्यांच्या वंशांतील तेजस्वी सूर्य अस्तास गेला.

**आप्पाराव**--( आईच्या गळ्यास मिठी मारून ) आई, बाबा मला सोडून गेला, आणि तूं समागमें जाऊं म्हणतेस. मीं अन्नपाणी

कोणाला मागावें ? कोणावर रुसावें ! मी मुल, माझें वय फार झालें तर दहा वर्षांचें. मला कोण आहे ? आपल्या हातानें मला अगोदर विष पाज, आणि नंतर जा. मी तुझ्या मागें जगायचा नाहीं, आई-बापांनीं मुलाचा त्याग केला, तर त्या अर्भकानें कोणाच्या तोंडाकडे पहावें ? आई, तुला माझी दया येत नाहीं काग ! तुला माझी शपथ आहे तूं जाऊं नको.

**लक्ष्मी०**—अन्नपाणी ईश्वराजवळ मागावें. ईश्वरावर रुसावें. आतां मला मायापाशांत गोवूं नकोस. ( मुलास ढकलते. )

**भाऊ०**—( मुलास जवळ घेऊन ) पुत्र असतां स्त्रियांनीं सती जाऊं नये. अभिमन्यू रणांत पडल्यावर उत्तरा सती गेली नाहीं. पंडु मृत झाल्यावर कुंती सती गेली नाहीं. शंतनु राजा मृत झाल्यावर भीष्माचार्यांची सापत्न माता सती गेली नाहीं. इतकेंच कशाला प्रत्यक्ष बाजीरावसाहेबांचें कुटुंब नानासाहेबासारखे पुत्र असतां सती गेलें नाहीं. हे सुभेदारसाहेब मल्हारराव होळकर यांचा एकुलता एक पुत्र खंडेराव तोफेच्या गोळ्यानें ठार पडला, त्या वेळीं अहिल्याबाई सती गेली नाहीं. सुभेदारसाहेबांची आज्ञा मोडली नाहीं. पोटीं पुत्र आप्पारावापेक्षां लहान मालीराव आहे त्याजकडे पाहून बिचारी दिवस काढते. अशीं शेंकडों उदाहरणें आपल्या पुराणांतरीं व प्रत्यक्ष आहेत. याचा विचार करा. या तुमच्या आप्पारावास सवाई बळवंतराव करीन, तरच नांवचा सदाशिवराव. पण तुमच्यामागें आई आई करून त्यानें प्राण सोडला तर मी त्याला काय करूं ! !

**लक्ष्मी०**—मूल तुमच्या ओटींत घातलें आहे. कळेल तसा सांभाळ करा. प्रपंचांतलें सर्व सुख मी अनुभवलें आहे. आतां कांहीं आस्था राहिली नाहीं. त्यांच्यामागें एक घटकाभर राहण्यास माझा जीव माशासारखा तळमळत आहे. मजवर दया करा. माझ्यानें जास्त बोलवत नाहीं. मला त्यांची केव्हां पुन्हां एकदां भेट होईल असें झालें आहे. भुजंगानें हृदयाचा कडकडून चावा घेतल्याप्रमाणें हें काळीज कसें व्याकूळ होऊन गेलें आहे. आतां मला राहण्याचा आग्रह करूं

नका. त्यांच्या मागें एक एक पळ युगासमान वाटत आहे. पति मृत झालेला ऐकल्याबरोबर जी प्राण सोडते, तीच महान पतिव्रता. मला एक घटका होत आली, अजून जिवंत आहें. यावेळीं आमचे आई-बाप आपण होऊन आमची बोळवण करा.

**भाऊसा०**—हें तुमचें निर्वाणीचें भाषण ऐकून अंतःकरण पिळून जातें. चला तुमची बोळवण करितों.

( सर्व मंडळी डोळ्याला पदर लावून जातात. )

[ चवथा अंक समाप्त. ]

---

# अंक ५ वा.

## प्रवेश १ ला.

स्थळ—पानपत येथील भाऊसाहेबांची छावणी, दुराणीची छावणी व रणमैदान.

**मल्हार०**—आज महिना सव्वा महिना झाला, सर्वांचे अन्नपाण्यावांचून हाल चालले आहेत. घोडीं माणसें पटापट मरत आहेत. अन्नावांचून लोकांचे हातपाय सुजायला लागले. सर्व दौलत बरबाद होऊन लोकांचा नाश होत आहे. फौजेंतील लोकांचें आतां असें ह्मणणें आहे कीं, आपल्याबरोबर आमचीं सर्वांचीं घरें बुडतात. आमचीं रांडापोरें, आमच्या डोळ्यादेखत, दुराणी घेऊन जातो. तुमच्या बुद्धीला भ्रम झाला आहे म्हणून तुम्हीं कोणाचें मानीत नाहीं. आपण सर्वांचा उपदेश मान्य करून सर्वजण तूर्त देशीं गेलों, म्हणजे षंढत्व आलें असें नाहीं. भाऊसाहेब, तुम्हांस श्रीमल्हारीनें सगळें ऐश्वर्य दिलें आहे. पण तुम्हीं हट्टानें बुडवीत चालला आहांत. सुबुद्धि सांगितली तर तुम्हांस राग येतो. कर्माची गति दुस्तर आहे. होणारी गोष्ट कधीं चुकत नाहीं. अशी वडिलांची एक म्हण आहे.

**जनको०**—अती हट्टवादीपणा चांगला नाहीं. श्रीशंकरानें रावणाला चौदाचौकडींचें राज्य दिलें होतें. पण त्यानें सीतादेवीला आणून आपलें राज्य बुडविलें. बिभीषण, कुंभकर्ण, मंदोदरी यांनीं सीता परत करण्याविषयीं उपदेश केला. परंतु त्यानें आपला हट्ट सोडला नाहीं. सगळ्या कुळाचा नाश करून घेतला. द्वापारयुगीं दुर्योधनानें असाच हट्ट धरला. सुईच्या अग्राइतकी माती पांडवांस देणार नाहीं. या हट्टामुळें अठरा अक्षौहिणी सहवर्तमान सर्वांचा नाश झाला. तुमच्या लष्कराची खराबी दुराणीस सर्व समजली आहे. पहिल्या प्रथम वकील झिटकारून टाकला. बळवंतरावपडल्यावर पुनः वकील आला. तेव्हां त्याला निरोप पाठविला कीं, तुमचीं हत्यारें हिसकावून घेऊन तुम्हांला देशोधडीस पाठवीन.

**मल्हार०**—आतां तुम्हाला दुराणी जमेस धरीत नाहीं. या वेळीं श्रीमंत नानासाहेब अगर दादासाहेब असते, तर त्यांनीं कधीं आपलाच हेका धरून बसले नसते. तुम्हांस असें वाटतें कीं, दुराणीचा मजकूर काय? मारून धुडकावून देऊं. गोष्ट खरी, पण ती वेळ आतां गेली. हा जीव तुमच्या अन्नाचा तुमच्यासाठीं खर्च झाला तरी हरकत नाहीं. पण अगोदर अन्नावांचून डोळ्यापुढें अंधाऱ्या येतात, याची वाट काय? सर्वांचा घात झाला. आमच्या डोळ्यांदेखत आमची प्रजा पटापट मरायला लागली. आमच्यानें हें दुःख पहावत नाहीं. लष्कर झडत चाललें. मातबर खासा खासा घोडा नसल्यामुळें पाय उतारा झाला. दिल्ली सोडून अन्य मार्गानें जावें तर झाडी दाट, मार्ग नाहीं. मग असें कुजून मरण्यापेक्षां रणांत मरण आलेलें काय वाईट आहे?

**भाऊसा०**—फार उत्तम आहे. यश किंवा अपयश महाराज छत्रपतीकडे आहे. ज्या प्रकारची मुक्ति साधुसंतांला मिळविण्यास नानाप्रकारचे कष्ट सोसावे लागतात. ती मुक्ति अनायासें मिळणार आहे. जीवित तृणासमान मानून मर्दुमकीची हिय्या न सोडता समशेरीची शर्थ करून दाखवूं. कौरवपांडव कुरुक्षेत्रीं धारातीर्थीं सुस्नात झाले. त्याप्रमाणें आपणही व्हावें. यापरता पराक्रम कोणता? तुम्हीं दूषणें दिलींत, तीं योग्य आहेत. पण गेली गोष्ट आतां येते असें नाहीं.

आतां भय धरल्यानें काय होतें ? श्री सांभरूपेनें दुराणीचा फडशा उडवून देऊं. त्याची तमा काय आहे ? मारतां मारतां कटून मरूं. पण अपयश घेणार नाहीं. क्यंव इब्राहिमखान ! तुमारी राय् इसूबारेमे क्या हय् ?

**इब्राहिम०**—जिस्‌वक्त दख्खनसे ह्यां आये, उस्‌वक्त ये बंदेने आपकू मय् नमकहराम कब्बी न होऊंगा, और ताबे उम्मर इमानसे चलेगा, ये कौल दिया हय्. उस्मे बिलकूल् तफावत होनेवाली नहि. ये अप यकीन् समजो. मय जातका मुसलमीन हय्. इमानका शाबुत हय्, इसूबारेमे ये देखो मुजे पचीस खत अब्दल्ली बादशहाके आये हय्, के तुम मुसलमीन होके गनीमके तरफ कयूसे शरीक होते ? हम तुमे पचास लाखकी मनसब आदा करेंगे. तुम हमारे तयनातूमे आना. ये खतके उप्पर नजीबखान, और जनाब सुजाउद्दवलासाहेब दोनोकोभी दसकत हय्. आब लढाईके बारेमे हमे तरकीब पूछे तो, कहते हय् के, जयसे आपलोक सात मोगलके दख्खनमे सामना करते हय्, उस्तौरपर सब फौजके आतूराफ् तोफ लगाके आराबा देना. कबिला बीचमे रखना. और जंग करते करते दुष्मनमेसे निकल जाना. देहलीकू पोहोंचना. बाद् उस्के तमाम जमियत् हुशियार करके दुरानीकू सामना देना, और नेस्त नाबुत करना. हमारी और समशेरबहादरकी सल्ला अयसी हय्.

**भाऊसा०**—हमे तुमारी राय कुबूल हय्. तुम हमसे इमानसे चलोगे, तो हम तुमसे कधी बेमान् न होनेवाले तुमारे सात कत्तल होगया तो मुजाका नाहीं. लेकीन् हम् पलटा न खानेवाले हय्. ये तुम खूप समजना.

**समशेर**—शेर बोले तो खाता, और बडा शेर बोले तो खाना, तो फिर डरनेमे क्या हासूल हय्. तकदीर का तारा सिकंदर हय्. बलंद पहाडोमे या जंगलमे जानेमे हासूल क्या ? ये निहायत् आपसासूकी बात हय्, के दुष्मन सामने खडा होके आप गनीम लोगोने ह्यांसें दख्खनके तरफ् जानेकी तरकीब निकालना, फरजंद किसके ? रावबा-

जीके ओर आप्पासाहेबके. सिवाय जंगके वापस गये तो उनका नाम बदनाम होता हय. इस बारेमे क्या ख्याल हय्?

**विश्वास०**—समशेरबहादरांचें म्हणणें अक्षरशः खरें आहे. उद्यां पहाटेची प्रहररात्र राहतांच कूच करण्याचा नगारा होईल. त्यावेळीं तमाम फौजेनें तयार होऊन बुणगे, कबिले बाहेर काढून तोफखान्याचा आराबा सभोंवार पसरावा. विषमज्वर, नवज्वर, क्षयाची भावना, वाख्याचा उपद्रव, इत्यादि रोगांनीं ग्रस्त होऊन, अखेरीस अंथरुणावर पडून मरण्यापेक्षां रणांगणांत, स्वदेशाच्या अब्रूसाठीं, स्वधर्मासाठीं, स्वजातीसाठीं, लढतां लढतां मरण आल्यास, अनंतपटीनें उत्तम आहे. असें भगवंतांनीं गीतेमध्यें अर्जुनास सांगितलें आहे. यावर सर्वांनीं भरवसा ठेवावा, आतां सर्वांना जाण्याची परवानगी आहे.

( **भाऊसाहेब** व **विश्वासराव** खेरीज करून सर्व मुजरे करून जातात. )

**भाऊसा०**— ( विश्वासरावाचे खांद्यावर हात ठेवून ) बाळा विश्वासा, समय फार कठीण आला आहे. प्राणावर येऊन बेतली आहे. तुम्ही नानासाहेबांचे आणि गोपिका वहिनींचे प्राणाचे प्राण. अगोदर तुम्हाला पाठवीत नव्हते, पण केवळ आमचे मनधरणीकरितां व लौकिकाकरितां पाठविलें. तुम्हीं हट्ट धरून मोहिमेवर आलांत, आतां विपरीत गोष्ट घडून येत आहे. तुमचें वय लहान. तुम्हीं अजून या जगांत काय सुख अनुभवलें आहे? तुमच्यासारखे गुणवान् पुत्र लढाईंत कामास आले, तर या अपेशाचें खापर माझ्या टाळक्यावर फुटेल. विश्वासराया, तुला मीं केवळ मरणाच्या घरीं आणलें. माझ्या हातून फार चूक झाली. याची तूं क्षमा कर.

**विश्वास०**—श्रीरामचंद्राला जसा भरत, तसे आपण नानासाहेबाला असून आपल्या मागें त्याची गति काय होईल? तुम्हीं उभयतां बंधु कायम असल्यास माझ्यासारखे पुत्र तुम्हांस पुष्कळ होतील. माझ्या स्वतःविषयीं मला कांहीं वाटत नाहीं. पण वाईट प्रसंग जर गुदरला, तर नानासाहेब तुमच्याशिवाय एक घटकाभरसुद्धां प्राण ठेवणार नाहींत. आपली जोडी केवळ धर्मार्जुनाप्रमाणें आहे.

**भाऊसा०**—( गळ्यास मिठी मारून ) विश्वासराया, आह्मीं तर सतीचें वाण घेतलेंच आहे, पण श्रीशंकर तुम्हांला साहाय्य होवो. माझ्यानें जास्त बोलवत नाहीं.

**विश्वास०**-आपण वडील सन्निध असतां मला काय भय आहे? शिवाय ईशसत्तेनें रणांत मृत्यु आला तर मुक्ति मिळेल. आणखी जगांत राहून काय पराक्रम करावयाचा आहे ! आतां प्रतिज्ञा हीच कीं, रूमशामावर स्वारी करून तेथील सरदेशमुखीच्या वतनाचीं वस्त्रें श्री छत्रपती महाराजांचे नांवें घेऊन नंतर ढाला माघाऱ्या फिरवूं. तुम्ही काडीमात्र शर्मी होऊ नका. मला नानासाहेबांपेक्षां तुम्ही अधिक ममतेनें वागवीत आहांत-चला आतां तयारी करूं. (उभयतां जातात)

( **सुजाउद्दवला** व **बादशहा** प्रवेश करितात. )

**बाद०**—( हुक्का पीत पीत ) नबाबसाहेब, तुम इतने रातकू क्यंव तशरीफ लायां ! गनीमकी क्या खबर हय् !

**सुजाउ०**—अब खबर बयान करनेकू तो बिल्कुल् अरसा नहीं. सिरफ् इतनाही मारुजा करता हय्, के जनाबने अबिके अबि, घोडेपर सवार होके, आपने सब जमियतकूं हतियारबंद तयार होना, आय्सा हुकूम फरमाना.

**बाद०**—मगर ये खबर आपकू किसने कहा, शायूत झूट् बात हैंगी.

**सुजाउ०**—ये खबर मुजे काशीराज पंडत, मेरा वकीलनें कहा. ओ बडा इमानी हय्. उस्के बातोंपर एत्बार रखनेकू कुच् हरकत नहीं. फिर मयनें उस्कु भाऊसाहेबके तरफ सदेसा देकर भेजा था. के आजके दिन लढाई तकूब रखना. कल बादशहाकी खायूष आपसे सल्ला करनेकी हय्. मगर भाऊनें जबाब दिया, के हम कुच जानते नहीं. जंगकू तयार होना. तमाम गनीम रिसाला लेके छावनीमेसे आपके तरफ् दौडते आते. हय्. ( तोफेचा आवाज होतो. )

**बाद**—तुम कहते हय् ये बात् बहुती बेहत्तर हय् [ हुक्का चाकराच्या हातांत देऊन ] बुलाव अबिके अबि वजीरसाहेबकूं, नजीबखानकू, लंगडेपठानकू, बरखोरदारखानकू ( चाकर जातो.

सगळे प्रवेश करितात. ) वजीरसाहेब, तुमने सब्ब जमियत्के बीचमे पचास हजार लोगोके सात रहेना. उनके डाये हातकू नबाबसाहेब, आपने रहेना. आपके डाये बाजूकू नजीबखानने रहेना. आपके डाये बाजूकूं शहापसंतखानने रहेना. वजीरसाहेबके सीधे हातके तरफ, अहमदखानने रहेना. उस्के सीधे हातकू-हफिजरहिमतखान, दुंदेखान, अमीरबेगखान, बरखोरदारखानने रहेना.

**नजीब०**—( इकडून तिकडे पळत पळत ) ये देखीये गनीम् कयसे आने हय. आस्ते आस्ते झेंडे लगाके, तोफका आराबा आगे डालके, सबके बीचमे, भाऊसाहेब, और बिश्वासराव हय्. उनके पास हुजुरातकी फौज हय. उनके दोनो बाजूकू बिचूरकर और यशवंतराव पवार हय. उनके दोनो बाजूकु दमाजी गायकवाड और समशेरबहादूर हय. उनके दोनो बाजूकू मल्हारराव होलकर और इब्राहिमखान गाडदी हय. होलकरके सीधे हातके तरफ मेरा दुष्मन जनकोजी शिंदा हय.

**बाद०**—जाव, तमाम लोग आपआपने जागेपर खडे रहेना. तमाम जमियत एक दफे देखके आबिके अबि हमला करनेकू हुकूम् देताहूं. ( सर्व जातात. )

( **मल्हारराव होळकर, जनकोजी शिंदे, विश्वासराव, समशेरबहादूर, इब्राहिमखान** व इतर मराठे सरदार प्रवेश करून ओळीनें उभे राहतात. )

**इब्रा०**—कल कयसा मनसबा किया के फौजका गोल बांधके, बीचमे बेकाम लोग डालके, तोफकू एकसा बत्ती देने हुवे, दुष्मनके फौजमेसे चले जाना. आब, देखा तो, तमाम बंदोबस्त महकूब होके सबके आगे तोफ चल रहि हय्. खयर खुदाहुतालाके एनायतसे सबकी फतेमंदी होगी. भाऊसाहेबसे नमकहरामी कबी न करूंगा.

**जन०**—हे पहा भाऊसाहेब. पीलबाला घोड्यावर स्वार होऊन आपला घोडा भरधांव फेंकीत येत आहेत. त्यांचा चेहरा आणि सर्व शरीर बालार्काप्रमाणें लाल होऊन गेलें आहे. नेत्र आरक्त

वर्ण झाले आहेत. काय भयंकर दिसतात! केवळ कल्पांतीचा सूर्य! चेहऱ्याकडे पाहण्याची कोणाची ज़ुरत नाहीं. हा वीरपुरुष कलियुगांत केवळ कर्ण जन्मास आला आहे.

**भाऊसा०**—( आवेशानें येऊन ) अहारे तलवारबहादर, माझे सरदार लोक, यार हो, या तुमच्या आर्यभूमीत राजा रामचंद्र, भीष्म, द्रोण, कर्ण, भीमार्जुन, विक्रमादित्य, श्री शिवाजीसारखे शेंकडों महापराक्रमी पुरुष होऊन गेले. ज्यांनीं आपल्या शौर्य-प्रतापानें शत्रूला हतवीर्य करून आपली अमर कीर्ति मागें ठेवली, त्याच नरशार्दूलांच्या वंशातलीं तुम्ही वीररत्नें आहांत. हा अभिमान आपल्या मनांत प्रखर जागृत ठेवून विमानारूढ झालेले हे आपले महापराक्रमी पूर्वज ह्यांना आपल्या अतुल प्रतापानें आश्चर्ययुक्त करून टाका. त्यांच्या हातून आनंदानें पुष्पवृष्टि करून घ्या. भरतभूमीच्या इतिहासकारांनीं या पानपतकर्नोलच्या लढाईंत मराठ्यांनीं तलवार गाजविली असेंच लिहावें. मराठ्यांनीं रणमैदानांतून कच खाऊन पळ काढला असें लिहूं नये. नाहीं तर तुमचे शूर नातू पणतू, तुम्हांला हंसतील. आपले पूर्वज नामर्द होते, बेहिमती होते असें ह्मणतील. घटोत्कच, अभिमन्यु, कर्ण, भीष्म यांसारख्या वीरांनीं समरभूमींत शयन केलें, तर आपल्यासारख्यांस रणांगणांत मरण आल्यास काय हरकत आहे? युद्ध हाच आपल्या महाराष्ट्रवीरांचा लग्नसमारंभ आहे. तलवार हीच आपली अर्धांगी आहे. समरांगण हाच लग्नमंडप आहे. युद्धांत पराभूत होऊन पुष्कळ दिवस जगून काय करावयाचें आहे? पिंड भक्षण करून कावळे सुद्धां हजारों वर्षें जगतात त्यांचें जीवित व्यर्थ आहे. ह्मणून आज एकतर शत्रूला हतवीर्य करूं, नाहीं तर धारातीर्थी देह ठेवूं हीच आपली प्रतिज्ञा.

**जनको०**—आम्ही जिवाची पर्वा करीत नाहीं. मृत्यु ह्मणजे कःपदार्थ? महाराजांसारखे आह्मांला पुढारी असतां दुराणीची बिशाद काय? एका धडकीसरसा प्राण घेऊं. आतां मी आणि सुभेदारसाहेब नजीबखानावर चालून जातों. इब्राहिमखान तुम्ही

बरखोरदारखान आणि अमीरखान यांनीं तुमच्यावर तुटून पडूं नये ह्मणून, त्यांच्यासमोर आपलीं दोन दस्तानें ठेवून बागनेट उभार-रलेल्या सात दस्तानानिशीं हाफीज रहिमतखान आणि दुंदेखान यांच्यावर हल्ला करण्याकरितां चाल करा. दमाजी गायकवाड तुह्माला मदत करतील. भाऊसाहेबांनीं व रावसाहेबांनीं खासा वजीर शहा-वलीखान ह्याच्या तुकडीवर चालून जावें, कारण दुराणी बादशहा स्वत: आलेला कोठें दिसत नाहीं.

**इब्रा०**—भाऊसाहेब, हरएक महिनेकू तनखेका बटवडा करनेके बारेमे, मयने अपकू बहोत् सताया हय्. सरकार मेरेपर बहोत् घुस्सेमे होंगे. आप तो सरकारका खजाना लूट गया. मगर आजतख् सर-कारका अनाज ये मुसलमीन् इब्राहिमखान गाडदीने खाया हय्. आब नवाजीस फर्माव. एक लहेजेमे बरखोरदारखान और अमीरखान, दुंदे-खान, हफीज रहिमतखान, इन चारोकू नेस्त नाबुद करताहूं.

**भाऊसा०**—तुमचीं हीं वीरश्रीचीं भाषणें ऐकून माझ्या अंगांत त्वेष सहन होत नाहीं. आतां उशीर नको. घ्या छत्रपतीचें नांव आणि करा हर हर महादेव. हा पहा शहावलीखान त्याचा मी समाचार घेतों. विश्वासराव, तूं आतईखानाचा समाचार घे. चला दौड करा.

( सर्व पळत जातात. )

( **सुजाउद्दवला** प्रवेश करितो. )

**सुजा०**—मारे गनीमके आठ हजार रोहिले कत्तल किया गया. ये इब्राहिमखान मानिन्द जिंदके उस्के लोग, फरांसीस लोगोने तरबेज किये हय्. मय समजताहूं, आब हफीज रहिमतखान और दुंदेखानकी जान बचना मुस्कील हय्. एकेकसे पास आब पांचसों एकदिल ज-मियत् नहि हय्. ये दमाजी गायकवाड और इब्राहिमखान दोनोने हजारोंकूं कत्तल फर्माया. हाय ! हाय ! शहावलीखान पाय उतारा क्यंव हुये ? भाऊसाहेब और विश्वासरावनें, दस हजार सवार, सात हजार इरानी बंदूकवाला, और एक हजार ऊंट, जिसके उपर जंबुरक हय् अय्से मानिंद संगीन फत्तरके दिवारसे खडे थे, मगर उनूनें सबकू

हटाकर, तीन हजारकी कतल किया. हाय ! हाय ! ये विश्वासरावर्ने शहावलीका भतीज्या मार डाला.

**वजीर०**—( प्रवेश करून ) तोबा ! तोबा ? कयूसे हरामजादे ये मेरे लोग हयू ? के मुजे गनीमके बीचमे अकेले छोडके मानिन्द औरतोंके भागते हयू ? आतईखान मेरा भतीजा, जिसने बुंदेलेका सर कत्तल किया, उस्कू विश्वासरावर्ने शिकस्त किया. अयू मेरे लोग तुम क्या दिवाने हयू, तो भागते हयू ? तुम किदर जायंगे ? हिंदुस्तान बडा देश हयू. तुम कितने भागोगे ? नबाब सुजाउद्दवला, अगर इस् वक्त, तुने मुजे मदत न किया, तो मय जानसे जाताहूं.

**सुजाउ०**—देखो जनाब गनीम मेरे नजूदीक् आया हयू. अगरचे ह्यांसे मय अबू येक उंगलभर इदर उदर करूं, तों मेरा रिसाला गनीमसे सफा किया जायगा. आब तुम् अयसे पादशहाके तरफ चले जाव. और उनके पास्से और जमियत ले आव. ये तरकीब् मुजे आछी मालूम होती हयू.

**नजीब०**—[ प्रवेश करून ] मेरे पास आलबता पंधरा हजार लोगोकी जमियत थी. जब जनकोजीने मेरे उपर हमला किया, तब मयने मानिन्द अतषबाजीके उस्के सब रिसालेमे अंगार अंगार कर दिया. बेचारा क्यां करे ? उस्कू हमला करनेकू अबितक् मौका नहि मिला था. मगर अबि उसूने आपने चचेका बदला लेनेके वास्ते मेरे उपर हमला किया. और मेरा बहोत खराबा किया हयू. जनाब अहमदशहा अबदल्लीसाहेब, बदस्तूर वास्ते जंगके ह्यां आये नहि. तमाम हमारे फौजने पलटा खाया. अब कुच अच्छी बात नहि. अब ये लोगोकी जान कैसी बच जायगी ? बादशहा कुच मदत भी नहि भेजते. क्या बडी ताजुबकी बात हयू ?

**लंगडा०**—( प्रवेश करून ) शिंदे होळकर सीधे हातके तरफ खडे थे. उनकू डरके, मयने और हमारे दोस्त बरखोरदार खानने घोडेपरसे नीचे कूदी खाके समशेरबहादरपर हमला कीया. उस्नेबी बडी जवामर्दी किया. मगर आखेर हमारे लोग घबराके भाग गये. अब चलो ह्यांसे. ये देखो गनीम इदर आते हयू. (सर्व पळत जातात)

(जनकोजी, मल्हारराव होळकर, विश्वासराव, इब्राहिमखान आणि समशेरबहादर प्रवेश करितात )

**इब्राहिम**०— आजतक भाऊसाहेबका मेरे गाडदी लोगोने आनाज खाया, मगर खुदाहुतालाने जंगमे फत्तेमंदी दिया. या परवर्दिगार, तेरे मेहेरनजरसे सब दुनयेके पडदेपर कारगुजार होता हय. अदमी खाली बडेजाव करता हय.

**समशेर**०—इसका नाम जंग, सब लाल रंग होगया हय. दुरानीने बहोत ढंग मचाया, मगर हमारे चंगबहादरोने नंगे समशेरीसे उनकी भंग उतार डाले. अब गंगामे न्हाके दख्खनके तरफ झंडे उडाते. चले जायूंगे

**विश्वास**०—आतईखानानें बुंदेल्याचें डोकें कापलें, त्याला तर मीं पहिल्या धडाक्यासरसा ठार केला. आजचा संग्राम फारच मयंकर ! अशी लढाई माझ्या सगळ्या जन्मांत झाली नाहीं. दक्षिणचे मोंगलांची लढाई ह्याच्या पुढें खात्रींत नाहीं. हौद्यास हौदे, घोडेस्वारांत घोडेस्वार, पायदळांत पायदळ, जेव्हां एकच मेळ झाला, बाणांच्या कैच्या, करोलांच्या गोळ्या आणि गर्नाला यांचा जेव्हां एकच मार झाला, जेव्हां एकच रणकल्होळ माजला, तेव्हां मला तर सूर्यास्ताचा भास झाला. मोंगल महापराक्रमी ! त्यांनीं तरी लढाईची सीमा केली; पण त्यांना पाठबळ नाहीं. त्यामुळें ते कचरले. पण दुराणी बादशाहा कोठें दिसला नाहीं.

**मल्हार**०–दुराणीची जात अरबूद, पठाण. रोहिले. महा चिलंदर लोक, पण आमचे मराठे त्यांहून वस्ताद. चौफेर लढाईची बेहद्द केली. पाण्यासारखे रक्ताचे पाट वाहयाला लावले. बीभत्स शरीरें तुडवीत घोडे पुढें काढीत होते. शरसंधान अगदींच राहिलें. तोफा बंद पडल्या. नुसते निमचे आणि समशेरा चालल्या. दोन प्रहर झाले. मराठ्यांनीं कापाकापी चालविली आहे. त्यांच्या नजरा फिरून गेल्या आहेत. मुडद्यांवर मुडदे पडावयास लागले आहेत. कबंधें नाचावयास लागलीं. देहाभिमान कोणांत उरला नाहीं. थोर अमिरांचे हौदे खालीं झाले. दुराणीच्या फौजेचा बंध तुटला. फौज उधळली. वीरश्रीनें आम्हांला माळ घातली.

**बातमी**०-आज उभयपक्षांकडील पन्नास हजार लोक ठार झाले. दुराणीकडचा तीस हजार कामास आला. आठ हजार जखमी झाला. शिवाय त्याच्याकडील घोडा वीस हजार, उंट सातशें, आणि हत्ती दोनशें, ठार पडला. भाऊसाहेबांकडचे नामी नामी सरदार, धारकरी, एकांडे हुजुरातीचे लोक मिळून वीस हजार ठार पडले. उंट पांचशें, घोडा पंधरा हजार, हत्ती नग सव्वाशे ठार झाला. नबाब सुजाउद्दवल्यास चार जखमा लागल्या. दुराणीचे दोन मुलगे लढाईंत ठक्क झाल्याची बातमी आहे.

**जनको**०--या कलियुगांत भाऊसाहेबांसारखा योद्धा कोणी झाला नसेल, पुढेंही होणार नाहीं. अशी घनचक्री उडाली, कीं केवळ भारतीयुद्धाची साम्यता करण्यास कांहीं हरकत नाहीं. ब्राह्मणकुलांत जन्म घेऊन भाऊसाहेबांनीं थोर पराक्रम केला. धन्य यांची जननी कीं असा पुत्र प्रसवली ! धन्य या पुरुषाचा पिता, त्याला साम्यता राजा दशरथाची किंवा पंडूची. काय त्या चिमाजीआप्पांचें भाग्य कीं रामासारखा पराक्रमी पुत्र त्यांच्या पोटीं जन्माला आला ! सप्तकुळांचा उद्धार केला. हे तुंबळ युद्ध पाहून स्वर्गीं इंद्रादि देवता स्तुति करूं लागल्या आहेत, कीं जातीचा ब्राम्हण असतां कर्णाप्रमाणें पराक्रम केला.

**भाऊसा**०—[ प्रवेश करून ] वीरहो, आज आनंदास पारावार नाहीं. अभिनव यश पावलों. आतां आपापल्या अंबारींत बसा. आनंदानें जयघोष करा. परमेश्वराची स्तुति करा. रणवाद्यें वाजवून सिंहनाद करा. आज माझ्या सरदारबहादुरांनीं जी मर्दुमकी केली तिचें वर्णन मी काय करूं ! शिंदे, होळकर, गायकवाड, पवार, विंचूरकर, पुरंदरे, इब्राहिमखान गाडदी, समशेरबहादर वगैरे सरदार व्याघ्रांसारखे खवळून जाऊन त्यांच्या झडपेंत जे जे कुर्रेबाज पठाण, रोहिले, किंवा दुराणी सरदार सांपडले, त्यांना त्यांनीं मेंढराप्रमाणें चिरडून टाकले. या भरतभूमीचे आतां तुह्मीं मालक आहांत. हे माझे मराठे वीर संपूर्ण वसुंधरेचें राज्य करण्यास योग्य आहेत ! त्यांच्याकडे डोळा वर करून पाहण्याची कोणाची माय व्याली आहे ! तुमच्या जिवावर, तुमच्या

पराक्रमावर, तुमच्या रक्तमांसांच्या जोरावर या पेशवेसरकारची सर्व मदार आहे. तुह्मीं सुखी तर आह्मीं सुखी! आम्हीं नुसते नांवाचे धनी. करते करविणारे माझे मराठेबहादर, आज तुम्हां सर्वांना अत्यंत श्रम झाले आहेत. आतां विश्रांति घेऊं. छत्रपतिमहाराजांचा उत्साह करूं. पराक्रम केलेल्या मर्दांनां लाखों रुपयांचीं इनामें वाटूं. जहागिरी देऊं. त्या पहा, वीरांगना, आपल्यास ओवाळण्यास येत आहेत. चला आतां आपल्या गोटांत [ एकमेकांचे हात धरून जातात. ]

( दुराणीलोक पुढें पळत आहेत, त्यांच्या मागें **अहमदशहा अबदल्ली, नवाब सुजाउद्दवला, वजीर शहावलीखान, नजीबखान, बरखोरदारखान, लंगडा पठाण,** असे लागले आहेत असे प्रवेश करितात. )

**सुजाउ०**—ये देखिये, आपके तमाम लोग भागते है. अब क्या करना? आब कोनसी तरकीब निकालना? गनीम आपने छावनीके तरफ फत्तेमंदी लेके बडे सजेमे चले है. अब ये भागनेवाले लोगोंकूं पीछे लानेके वास्ते बखुबी तजवीज कोनसी करना? जनाबके दो फर्जंद ये हुनूद लोगोंके जंगमे हक्क हुवे सिवाय वजीरसाहेबके भतीजे आतईखानका विश्वासरावनें जान लिया है. इस् बारेमे बदला लेना जरूर है.

**बादश०**—नजीबखान, तुम हमारे लेसकचिके पांसो लोंग बुलाव और जो कोई हत्यारचंद दुराणी जंगमेसे पलटा खाकर भागता होगा, उसकी गरदन उतार डालो. अगर्चे वो खुषीसे जंगके वास्ते वापस् आया तो उसकू आनो दो. ( नजीबखान जातो. ) आब देखो अहमदशाहा कैसा बखूबी नजबीजसे तमाम गनीमकूं कत्तल करता है मेरे दो फर्जंदकू कत्तल किया. मैभी दोनो पेशवेकूं कत्तल करूं. [ **नजीब** परत येतो. बरोबर पळालेले लोक आणतो.

**नजी०**—तमाम लोक वापस वास्ते जंगके आये है. आप चाहे सो हुक्म फर्मांव. मेरी राय आब ये है के, वजीरसाहेबके सुपुर्द दस हजार फौज देना. मै दसहजार ले जाताहूं. और दस हजार बर-

खोरदारखान और लंगडे पठान आपने साथ ले जावेंगे. गनीम लोट जाते हय्. उनके उपर मानिंद् शेरके हमला करो. दौडत दौडत हमला करेंगे.

**बादशा०**—हमे तुमारी राय कबूल है. ( सर्व जातात. **बादशाहा** व **सुजाउद्दवला** राहतो. )

**सुजाउ०**–( दुरबीन लावून ) या एलाहि! ये क्या तोबा चल् रहा हय्! इस वक्त गनीम बहोत गाफल था. आब ऐसें हालतमे उनकू नेस्त नाबूद् करना बहोत् बेहेतर हय्. तलवार, भाला, कडाबिन तमंचा, बंदुका क्या मार चल् रहा हय् देखीये. क्या बडेबडेसे हरहर माधव करके फुकारते हय्. आब तुमारा हरहर माधव एक लेहजेमे उडा देते. दीन जागे दुरार्नी कत्तल करता हय्. भाऊसाहेब और शिंदा जनकोजी, मल्हारराव होलकर पायउतारा होके बदस्तुर तलवार करते हय्. या करीम् विश्वासराव हातीपरसे नीचे गिरा. याकिन् ये कामील हय् के कोहिने तोबी उस्कू बंदुकसे मारे हय्.

**बादशा०**–उस्कू मारना नहिथा. चचेकू और भतिजेकू, जिंदा पकडके लानाथा. मय् आपके सात दोनो कम्मनकू खंदहारके तरफ लेजाताथा. ( **विश्वासरावांचें** प्रेत घेऊन नजीबखान व दुराणी लोक प्रवेश करितात ) अहाहा ! क्या खुप्सुरती हय ! जयसा नींदमे मषगूल हय. हुस्न बहोत पाकसुरत हय्. कोनसे बेकदरदान अदमीने अयसे शेहजादेकू खतम् किया ? इस्कू जिंदा लानाथा. फिर तमाम दख्खन आपने हातमे थी. तमाम आपने लोग दौलतमंद बन जाते थे. खयूर आब क्या जो हुवासो हुवा.

**नजीब०**–सरमेसे लहु निकलता हय. कोनसे बदमाषने गर्दनकू तलवारसे वार किया हय् ! और छातीमे जोड गोली निकल गयी हय ! ये बिलकुल् छोकरा हय्. ये भाऊसाहेब कोन् बेअक्कल हय्, के अयसे नाजूक शेहजादेकू जंगमे लाया ? मगर ये नाजुक कायका ? इस्ने वजीरसाहेबका भतीजा आतईखान इतना बडा लडवयाकू हक्क किया– ( त्याला वारा घालतो त्याचें रक्त पुसतो. ) सिंदे और बडा होलकर नालायक हय्, के अयसे शेहजादेकू खाली मारनेकेवास्ने हमारे लष्करमे लाया.

**सुजाउ**०–अब् जनाबके पास ये मारुजा हय्, के ये हिंदु राजाका मुरदा हय. वास्ते इस्के दफनके मेरा माताइत उमरावगीर गोसाई हय, उस्कू ये सुपूर्द करना. कोनसेभी मुसलमीन लोगोने इस्कू सताना नहि. खुदा हुतालाने आपकू फतेमंदी दिया; इसवास्ते बादजंगके महजीदमे नमाज पढनेके वास्ते सबने चलना.

**बादश**०–या परवरदिगार! ये तेरी कुदरत् हय्. शायत गनीम लोग अबि वापस आपने पीछे दौडते आयेंगे. इस्लिये आपने बडे हुशियारीसे और खबरदारीसे रहेना चाहीये. चलो तुम सब लोगोकू बडी खिलात देताहूं ( सर्व जातात. )

**(भाऊसाहेब, जनकोजी, होळकर, इब्राहिमखान समशेरबहादर** प्रवेश करितात)

**भाऊसा**०–कोण हा दुःखाचा डोंगर माझ्या टाळक्यांत कोसळला ! ! ! हा आगीचा लोळ माझ्या छातीवर पडल्यानें माझें हृदय जळून खाक झालें ! नानासाहेब, तुमचे मुलाचा परिणाम काय झाला ? या अभाग्याच्या संगतीनें विश्वासराव टार झाला. आतां तुह्मी ब्रह्मांडमंडल फुटून जाईल असा जरी आक्रोश केला तरी विश्वास परत येत नाहीं. मीं अगोदरच भाकीत केलें होतें, कीं हें अपेशाचें खापर माझे माथीं फुटणार. छातींत गोळी लागल्यावर सुद्धां थोडा प्राण होता, त्या आशेवर आणखी आर्धा प्रहर मी तलवार केली. अखेर मला बातमी लागली कीं विश्वासरावाचें देहावसान झालें. प्रेत दुराणीच्या हातीं लागलें. काय दैवयोग ! विश्वासराया, तुला मी लढाईच्या अगोदर दक्षिणेंत पाठवीत होतों, त्या वेळी तूं हट्ट धरलास, आणि आज पराक्रम करून समरांत देह ठेवलास. गिलच्यांनीं तुझ्या प्रेताचे तुकडे तुकडे केले असतील ! ! ( **होळकराच्या** गळ्यास मिठी मारून ) सुभेदार, जनकोजी तुम्ही आतां पुण्यास जा. आमचें कुटुंब बरोबर न्या. श्रीमंत नानासाहेबांस आणि श्रीमंत सौभाग्यवती गोपिकाबाईस माझे साष्टांग नमस्कार सांगून विज्ञापना सांगा, कीं तुमचे चिरंजीव विश्वासरावसाहेब, भाऊसाहेब, पांच लाख सेनेसुद्धां इंद्रलोकीं खुशाल आहेत. कांहीं काळजी करूं

नये, उभयतां वडिलांनीं आजपासून माधवराव यांच्यावर लोभ करीत जावा, ते केवळ अर्जुनाचा अवतार आहेत, कदाचित् दुराणींनीं तुमचा पिच्छा पुरवला, तर आमचे कुटुंबाचा शिरच्छेद तुह्मीं आपल्या हातानें करावा. पण शत्रूंच्या हातीं जिवंत लागूं देऊं नये.

**जनको०**—विश्वासराव पडले, आतां आम्हीं जर हें काळें तोंड नानासाहेबांस दाखविलें, तर ते काय ह्मणतील? सुभेदार साहेब वृद्ध आहेत. त्यांनीं मात्र या वेळीं सर्वांचें कबीले घेऊन दक्षिणेंत जावें. आतां सगळी निरवानिरव त्यांनीं करावी. मला खाविंदांच्या मागें जीव ठेवावयाचा नाहीं. मला राज्याची आशा नाहीं. धनदौलतीवर मी लाथ मारतों. धन्यासाठीं माझा देह रणांत पडल्यानें मी कृतकृत्य झालों. स्वामीभक्ति सोडणार नाहीं. सत्याला पराङ्मुख होणार नाहीं. सत्यासाठीं हरिश्चंद्रानें राज्यावर पाणीं सोडिलें, स्वतःला डोंबा घरीं विकून घेतलें, बायकोचें डोकें तोडण्यास तयार झाला. सत्यासाठीं रामानें चवदा वर्षें वनवास भोगला. सत्यासाठीं पांडवांनी दास्य केलें. त्याच कुळांत आणखी त्याच देशांत, परमेश्वरानें आपल्यास जन्मास घातलें आहे. करितां खाविंद जर स्वतः पुण्याकडे येतील, तर मी जाईन. नाहीं तर जेथें भाऊसाहेबांचा जोडा पडेल, तेथें या जनकोजींचें डोकें पडेल.

**मल्हार०**—इतक्या हद्दास पेटण्याचें कारण नाहीं. आपण सालमजकुरीं उज्जयनीस छावणी करूं. पेस्तर सालीं गिलच्यांचा समाचार घेऊं. पुण्यास जाण्याची श्रीमंतांना शरम वाटत असेल, तर वर्षसहा महिने नर्मदेच्या कांठीं मुक्काम करूं. सर्व सरदार, हत्ती, घोडे, उंट, पायदळ, खाऊनपिऊन हुशार झालें, म्हणजे पुढल्या वर्षीं रुमशामची खबर घेऊं. हिंदूचे मुसलमान होऊं, पण छत्रपतींचें नांव राखूं. आपण कांहीं तरी पदरच्या माणसांचें ऐकत जावें. पेशजी आप्पासाहेबांनीं वसईकिल्ला घेण्याच्या वेळीं अशीच घोर प्रतिज्ञा केली होती. परंतु चौघांचे मतें एखादें काम करीत असत.

**भाऊसा०**—विश्वासरावाला गोळी लागून तो ठार पडला. आतां

जरी मोठा पराक्रम केला, तरी गोपिकावहिनी माझें मुखावलोकन करणार नाहींत. आतां त्यांच्या भेटीस जाणें उचित नाहीं.– कुठें आहे गंगोदक ? एक वेळ प्राशन करितों ( प्राशन करितो ) झालें आमचें पारणें. हैपान घोड्यावर जीन चढवून आणा, सुभेदारसाहेब, येतों आतां. रामराम. मी तुमचा मूल आहें. बोलल्याचालल्याचा राग मनांत ठेवूं नका. होणार गोष्ट घडून आली. परमेश्वराची इच्छा ! चला दौड करा. [ भाऊसाहेब, शिंदे, समशेर इब्राहिमखान पळत जातात. ]

**मल्हार**०–काय मी चांडाळ आहें कीं, असे असे हिरे पटापट स्वर्गास जातांना या डोळ्यांनीं पाहण्याचा वृद्धापकाळीं मला प्रसंग आला आहे ! यांच्या कुटुंबांना जाऊन मीं काय निरोप सांगावा ? विश्वासरावाच्या कुटुंबाला मीं काय म्हणावें ? परमेश्वरानें मजकडे या संसाररूपीं नाटकांतील अत्यंत शोकप्रद पात्राचें काम दिलें आहे. यापेक्षां मला एखाद्या झोंपडींत पडून सुखाची भाकरी खावयास दिली असती तर किती बरें झालें असतें ? हे दुःखाचे डाग मला ह्यातार्‍याला सहन करवत नाहींत. मल्हारी, आतां सोडीव मला या जाचांतून. ( जातो. )

( **भाऊसाहेब,** सात आठ दुराणींनीं धरलेला आहे असा प्रवेश करतो. )

**पहिला रोहिला**०––तूं कौन हय् ? भाऊसाहेब तूं हय् क्या दुसरा कोई सरदार हय् ? बोल इस्का जबाब, इसके पास जवाहिरात बहोत हय्.

**दुसरा रोहिला**––ये घोडेपर सवार होनेमे बडा कार्बाल् हय्. मय इस्कू सुभोंसें देखता हूं. इस्के नीचे तीन घोडे ठार होगये. अय्सी इस्की ताकद हय्. हजारो दुरानी लोगोंकूं इन्ने कतल किया हय्. आब येकू लब्हज् निकालना नहि. तेरा नाम क्या हय् ? हम् कुच तेरेकू इजा नहि करते, तेरेकू चाहे उदर हम् ले जायंगे. लेकिन तू

आपना नाम बोल. ( तो कांहीं बोलत नाहीं असें पाहून त्याला माला मारून खालीं पाडतो. )

**भाऊसा०**—( पडतां पडतां दोन तीन दुराणींना जखमी करून खालीं पडतो ) काय या शिकंदर नशिबाचे ताले आहेत ! श्रीकृष्ण परमात्म्याला ज्याप्रमाणें यःकश्चित् व्याधाच्या हातून मृत्यु आला, किंवा शिखंडीनें भीष्माला घायाळ करून रणांगणांत निजविलें, तशी माझी स्थिति झाली. यापेक्षां मला समरभूमींत मरण आलें असतें तर फार बरें झालें असतें. आतां हे दुराणी माझा प्राण घेतल्याखेरीज सोडीत नाहींत. माझें धैर्य नष्ट झालें. कारण मी नाउमेद झालों. मला जीव नकोसा झाला आहे. नाहीं तर हे मूठभर भामटे चिरडून टाकिले असते. उदगीरच्या लढाईंत फत्ते झाली म्हणून अभिमान चढला; पूर्वीचा मराठ्यांचा बाणा सोडून मोंगलांचा डामडौल केला; मराठ्यांची लढाईची रीत म्हणजे शत्रूला जिकडून तिकडून आडवून, दाणा वैरण बंद करायची, ती सुभेदार सांगत असतां सोडून दिली. एकदम सामना केला. जाटाचा उपदेश न ऐकतां त्यास वाईट शब्द बोलून घालविला; होळकराचें मन दुखविलें; खदक खणून स्वतःला कोंडून घेतलें; सगळें सैन्य युद्धास एकदम आणिलें; मागें कांहीं ठेवलें नाहीं; सुजाउद्दवल्यावर विश्वास फार ठेविला; त्यानें माझीं सर्व पत्रें दुराणीस दाखविलीं. विश्वासघात केला. विश्वासराय पडल्यावर धीर सुटला. लाखों जीव माझ्या पायीं बळीं पडला. ज्याची युक्ति फसते तो मूर्ख. असा तर्क शहाणे लोक करीत नाहींत. हे नशिबाचे गोते आहेत. जनकोजी तुझी भेट झाली नाहीं. तूं खरा स्वामीभक्त.

**दुसरा रोहिला**०–आयू आदम मरनेकूं तय्यार हो. [ त्याच्या छातींत गोळी मारतो. **भाऊसाहेब** रामराम करून तडफडून प्राण सोडतो. ]

---